त्यांत स्वराचा योग केल्यानें जोडाक्षरें होतात. –मराठी भाषेचें व्याकरण पृ. ११.

**जोडी**—स्त्री. १ जोडा; जोडपें; युग्म (एका जातीचें); जुळें. 'ही मोत्यांची जोडी पाणीदार आहे.' २ संच; जोड (हरिदास, पुराणिक इ०चा–एक मुख्य व दुसरे मदतनीस यांसह). ३ बरोबरी; साम्य; तुल्यगुणत्व. 'यानी त्याची जोडी बनली.' ४ (काव्य.) ठेवा; सांठा; राशी; लाभ. 'देवीं म्हणे रहा क्षण करिसी निरयार्थ काय जोडि खळा।' –मोसभा ५.११७. 'गुण गाईन आवडी। हेंचि माझी सर्व जोडी।' –तुगा ११९३.५ सरकारी सारा, पट्टी. जुडी पहा. ६ एका वेळीं फिरविण्याचे दोन मुद्गल. ७ प्रारब्ध; नशीव. 'तुझें कर्म असे सहज। आपली जोडी भोगावी।' –गुच २०.२१. ८ प्राप्ति; संग्रह. 'मानसा करि तयाचिच जोडी।' –सारह ४.१०४. **जोडीचा**–वि. जोडीसंबंधी; बरोबरीचा. **जोडीव**–वि. तुकडे जोडून केलेलें; ज्याला तुकडा जोडला आहे असें; जोडलेलें; एकत्र केलेलें; ठिगळ लावलेलें. [जोड]

**जोडें**—न. १ विवाहित जोडपें; जोडा (स्त्रीपुरुषांचा, नरमादीचा). २ (कों.) नारळांची जोडी. ३ (राजा.) हातापायांतील जोडवें; वळें.

**जोडेजोडे**—क्रिवि. (खा.) बरोबर; एकमेकांच्या संगतीनें. –भाि ७.१–८. [जोड द्वि.]

**जोत**—न. (कों.) १ जुंपलेल्या बैलांची जोडी (क्रि० बांधणें; लावणें; लागणें). २ बैलांच्या जोडीनें ओढलेला नांगर. 'जोत चालणें–धरलें–पडलें–सुटलें.' (खा.) ३ जुंपणी. ४ (कु.) दोन होड्यांनीं समुद्रांत जाऊन मासे मारतात तें जाळें. ५ (हिं.) नांगरणी; लावणी. ६ (व. खा.) बैलाच्या गळयास जूं अडकविण्याचा पट्टा. [सं. युत; फ्रेंजि. जुतो; सं. योक्त्र; प्रा. जोत्त; हिं. जोत; म. जोतें] म्ह० पुढील जोत तसें मागील जोत. ०करी–वि. (गो.) शेत नांगरणारा. जोतकरी पहा. **जोतणें**–(व. खा.) (बैल) जुंवास जुंपणें. [सिं. जोटणु] ०पात–न. नांगर, बैल वगैरे शेतकीस लागणारें सामान.

**जोत**—पु. घुमट वाद्यावर म्हणावयाचें एक गीत. 'एक जोत गायधाग त्यानें आरंभ केला.' –सह्याद्रि ६८.

**जोत**—स्त्री. १ ज्वाला. २ तेज; उजेड; चकचकीतपणा; शोभा; चमक. 'जोत जरिपटक्याची' –ऐपो १९१. ३ तेज; पाणी; झकाकी (रत्नांची). ४ सफाई; चकाकी (वस्त्राची). ५ पाणी (शस्त्र किंवा हत्याराचें). ६ जोर, जोम; सत्त्व; तेज; बळ; जोरकसपणा (पाऊस, ऊन, पीक, पदार्थ, मनुष्य, प्राणी, धंदा, व्यापार इ० चा). ७ प्रख्यात माणूस किंवा कडक देवस्थान; जागती ज्योत. 'हा साधु किंवा हें देवस्थान मोठी जोत आहे.' ८ पदार्थांतील जळजळ. (क्रि० लागणें). [सं. ज्योति] ०धरणें–तेज; शोभा, जोर, सौंदर्य संपादन करणें किंवा येणें. ०कार–वि. (गो.) देवाजवळील दिवे लावणारा. ०दार–वि. १ तेजस्वी; चकचकीत; लखलखणारा; प्रकाशमान. २ (ल.) शहाणा; धूर्त, समर्थ; हुषार; बुद्धिवान; प्रतिभाशाली.

**जोताड**—स्त्री. (ना.) ज्योत. [जोत] ०लावणें–(ना.) आगलावेपणा करणें.

**जोतिबा, जोतिर्लिंग**—न. महादेव; महादेवाचें लिंग, पिंडी; शंकराचें देवस्थान. [सं. ज्योतिर्लिंग]

**जोतीवंत**—वि जोतदार पहा. [सं. जोत–ती+वंत प्रत्यय]

**जोतें**—न. चिरेबंदी कडा, कांठ; हिच्या योगें घराची गच्ची किंवा ओटा सुरक्षित राहतो; चौथरा; गच्ची; उंच केलेली जागा. दिव्यानीं बांधलेला ओटा; इमारत बांधण्यापूर्वीचें चिरेबंदी काम. 'गरुडपारांचीं जोतीं।' –ह १४.१३५. [सं. युक्त; प्रा. जुत्त?]

**जोतें**—न. १ जिनें बैलाचा गळा जोखडाशीं बांधला जातो ती दोरी किंवा पट्टा. २ जूं; शेलें [वै. सं. योक्त्र; प्रा. जोत्त; का. जत्तगी; हिं. जोत]

**जोतेकार**—पु. (गो.) चांभार; जुतें करणारा. [हिं. जूता=जोडा+कार]

**जो तो**—सना. १ जो कोणी; प्रत्येकजण; प्रत्येक मनुष्य; हरएक व्यक्ति. 'जो तो चेष्टवी मुला।' –भारावाल ९.७४. २ कोणी; कोणी एक; कोणी तरी. 'जो तो म्हणे हा प्रचंडवीर। सांगती रावणासी वडिवार।' –रावि २१.११४. [जो+तो]

**जोत्या**—वि. नांगऱ्या; नांगरणारा माणूस; जोत धरणारा गडी; शेतकरी; २ (ल.) गांवढळ; नांगऱ्या. ३ (ल.) मंदबुद्धि; ढ; अक्षरशत्रु. [जोत; हिं. जोतिआ]

**जोंधळा**—पु. एक धान्याचें रोप व त्याचा दाणा; ज्वारी (धान्य) किंवा त्याचें ताट. याच्या जातीः–उतावळी, निवळा, शाळू, रातडी, पिवळा जोंधळा, खुंडी, काळवोंडी, दूधमोगरा, याशिवाय केळी, अरगडी, डुकरी, वेंदरी, गडगूप इ० हलक्या जाती आहेत जोंधळयाच्या भाजून लाह्या करतात व कुजवून दारू काढतात. पिठाची भाकरी होते. [सं. यावनाल; प्रा. जोण्णलिआ; का. जुनळ; तेलगु. जोन्न; हिं. जोन्हरी] **जोंधळी पोत**–स्त्री. जोंधळयासारखे बारीक सोन्याचे मणी असलेली व ४।५ पदरांची, मधोमध जाळीचा मणी किंवा वेलपान असलेली पोत. **जोंधळे उचलणें**–शपथ घेणें. (शपथेचा एक प्रकार).

**जोधा**—पु. योद्धा. –वि. १ मजबूत; धष्टपुष्ट; राकट; पहिलवानामारखा. 'देरा कवणु तो जोधांचा मेळावा।' –शिशु ९४४. २ (व.) उंचापुरा; लठ्ठ व टोकळ हातापायांचा. [सं. युध्]

**जोप-पें**—न. वांसरूं; जावपें पहा. (गाईचें, म्हशीचें).

**जोपणें**—उक्रि पाळणें, रक्षण करणें, सांभाळणें- राखणें [ स गुप्=रक्षण करणें ]

**जोपर्यंत-पावतों**—क्रिवि जेव्हां आज-वारपर्यंत, ज्यावेळे पर्यंत, पर्यंत [ सं यावत् ]

**जोपा, जोपन**—स्त्री काळजी, निगा, संगोपन, संरक्षण, जोपासना ' जो पाहे सद्‌गद्विचार हृदयीं जोपा जनाची करी । ' -र ४ [ स गुप् ]

**जोपाणें**—अक्रि धावणें 'मग ते अंतरजोपातां गुणीं पावणे परिपुष्टा ।'-गीता ११ १७८

**जोपारणें**—अक्रि जोपारणें, उल्ट जबाब देणें, वेफर्वाई दाखविणें, उद्धट होणें जोपारणें पहा ' वर मलाच उलटें अग काय करता हो म्हणून जोपाराव ? '-फाटक, नाटघछटा १ —सक्रि. झिडकारणें, तुच्छ मानणें, तिरस्कारबुद्धीनें नाकारणें.

**जोपाव(स,णें**—उक्रि. (कों.) काळजी घेणें, निगा राखणें, संगोपन करणें, बरदास्त ठेवणें (बागाईतसंबंधीं माईला लावतात व मनुष्यें, प्राणी वस्तु यासंबंधीं मनुष्याना लावतात) [ स गुप् ]

**जोपासीर-ल, जोपा, जोपासना-सणी**—स्त्री (कों राजा ) निगा, बरदास्त, काळजी, लक्षपूर्वक पालनपोषण किंवा साभाळ, संगोपन करणें [ स गुप् ]

**जोंबडा**—पु (राजा ) १ जुमडा, गवताचा भारा, गड्डा, पाटा. २ (विशेषत) शेतात टाकलेला किंवा फळझाडावर बांधलेला विडा, सरकारद्वाहीचें असें काहीं चिन्ह यावरून शेत कापणें किंवा झाडावरचीं फळें तोडणें यास सरकारी मनाई आहे असें रामजग्याची खूण ' या आम्यास द्वाहीचा जोंबडा बांधला आहे, आंबे पाडू नका ' ३ (ल ) सैल बांधलेली शेंडी [ जुंबाड ]

**जोंबन**—पु १ (स्त्रीचा ) स्तन कुच, थान ' तंग चोळी छातीवर जोबन कोवळे रसरसले । '-होला ८९ २ तारुण्य, ज्वानी [ सं यौवन, प्रा जोव्वन, हिं जोबन ]

**जोंबाड**—न झोंबाड, झोंबाड पहा

**जोंबाळणी**—स्त्री जोपासना, जोपासीर, जोपा पहा [ जोंबाळणें ]

**जोंबा(मा)ळणें**—उक्रि १ (कों ) जोपावणें पहा उत्तम रीतीनें राखणें जपणें ' एवढे दिवस दागिना जोंबाळून ठेविला होता म्हणून प्रसंगीं उपयोगी पडला ' २ नेहमीं गोंजारणें, लाड करणें (लहान मूल इ० ना) ' ममतेनें पोरास घरीं जोंबाळून ठेविला तर निगा बरी राहील ' नेहमीं कुरवाळणें लडिवाळपणें वागविणें किंवा सांभाळणें, पाठीवरून हात फिरविणें (आवडता प्राणी, वस्तु यांच्या )

**जोरेदंड**—वि १ शक्तिमान, जोरदार बळकट. २ जवान मर्द, धिप्पाड, दांडगा मलेल्ल

**जोम**—पुन १ पराक्रम, दार्ढ्य, घनता, शरीराच्या या भागा व चेहऱ्याचा तजेला, भरदारपणा २ शारीरिक बळ, जोर, शक्ति, ताकद (बांध्याच्या घट्टपणामुळें) ३ जोर दम, अवसान [ स यौवन, प्रा जोव्वण ] **जोमांत असणें**- १ (माण ) शोकांत किंवा रागांत असणें २ जोरांत असणें, उत्साह युक्त असणें ०दार-वि १ घट्टमुट, दृढ, आवळी. २ शक्तिमान, बळकट, जोरदार ३ दमदार अवसानयुक्त

**जोयशी**—पु (कु ) ज्योतिषी, जोशी [ सं ज्योतिषी ]

**जोर**—पुन १ जोम, शक्ति ताकद, बळकटी २ स्थैर्य, दार्ढ्य, गंभीरपणा, दमदारपणा, सहनशक्ति (सजीव प्राणी, वस्तु यांची ) ३ वेग, शक्ति आघात तडाखा, नदीचा वेग (वारा, बंदुकीची गोळी यांचा ) ४ जुलुम, जबरदस्ती, अन्याय ५ दाब ताण, नेट, वजनाचा भार ' सगळे भोई सारखे असल तर बरं, नाहीं तर टेंगणा असतो त्याचे माथावर भारी जोर येतो ' ६ जोष, पूर्ण वेग, भर (रोग, पाऊस, थंडी यांचा ) ७ तालमींतील एक व्यायामविशेष, दंड (क्रि० काढणें) ८ (नावि ) पूर, समुद्राची भरती (विशेषत पौर्णिमा-अमावास्येच्या दिवशींची), भाग, उधाण ९ (यंत्रशास्त्र ) प्रेरकशक्ति १० महत्त्व, भर या गोष्टीवर गव्हर्नरसाहेबांनीं बराच जोर दिला होता ' -केले १ १९९ [ फा झोर्, अर जोर् ] (वाप्र ) ०करणें-लावणें-जोरास येणें= जबरदस्तीनें वागणें, अडथळा करणें, शक्तीची, बलात्काराची गरज उत्पन्न करणें, तडीस नेण्यास उरकण्यास कठिण करणें, जाणें ' आज पावेतों रुपये देतों दतों म्हणत होता पण अता जोरास आला त्यापेक्षा उपाय घातला पाहिजेत ' ०देणें-१ पुष्टी, मदत, आधार देणें २ महत्त्व देणें, विशेष उल्लेख, निर्देश करणें **म्हण**० जोर थोडा, आणि धुरळा बडा -भाव २८ सामासिक शब्द- **जोराचा**-वि नेटाचा, अति मोठा ०कस-दार-वान-वि १ दंड काढणारा २ पहिलवान, ताकदवान बळकट सशक्त ०गत-स्त्री (राजा ) उधाण, उसाण, भांग, समुद्राची भरती (अमावास्या व पौर्णिमेची ). ' पुनवेच्या व जोरगतीच्या दिवशीं भरतीच्या वेळीं मानसेचीं दारें बंद केल्यावरसुद्धा काय विशाद होती '-सावात्री १४ ०जबरी-स्त्री जुलुम, जबरदस्ती ०तलब-ब-स्त्री १ (कायदा ) हजर राहण्यासाठीं जोराचें बोलावणें २ अन्यायपूर्वक हरण, बलत्कारानें हरण, बलात्कार ' जोरतलबनें ऐवज शिंदे यांनीं आणिला म्हणून वर्तो आहे '-ख१ ४९८४ 'माझें मनात आलें तर घईन, तुमचे जोरतलबेस भिणार नाहीं ' ०तलबी-बी-स्त्र जुलुम, जबरदस्ती -वि १ जुलुमाचें, जबरीचें, जोराचें, बलात्काराची (हजेरी, पैसा उकरणें यासंबंधीं मागणी) 'त्यापेक्षा अमर जोरतलबीचा सुरू करावा ' -मराचियोशा ७७ २ मग्रूर अरेराव ' कोठें जोरतलबा मशाल असतील, हरामखोरास तबी पोहोंचावून

पैसा वसूल करून देणें '-मदवा १ ११८ -पेद ६ १४९ [फा] ०तलगीटीर-सर-स्त्री. पत्त्याच्या खेळातील एक सज्ञा ०बळ-न शारीरिक बल, पाशवी शक्ति, आडदाडपणा, दाडगाईचा जोर, वळ, शुद्ध दाडगाई, जुलूम [फा झोर्+स. बल] ०पट्टी-स्त्री दोन थरास जोडणारी पट्टी 'जरूर पडल्यास वरवडच्या जोर पट्टीनें जोडाव्या '-मॅरट१३ ०बेजोर-बेजोर क्रिवि जोरा वारीनें, जबरदस्तीनें 'इग्रज घाट चढोन येउन जोरबेजोर होसकऱ्याचें ठाणें घेतलें.'-ख ९ ४४५४. 'प्रधानाच्या फौजेनें बदामीचा किल्ला जोरबेजोर फते केला '-ख ८ ४०९०.

जोर—पु (गो) ज्वर ताप [स ज्वर]

जोरा—पु १ अधिकार, सत्ता, जोम, सत्ता 'सावका राचा जोरा कीं सरकाराचा जोरा' २ जुलूम, जबरदस्ती अन्या याचा दंड, शिक्षा ३ शह, जोर 'स्वामीचे पुण्यप्रतापें अवदा लीस जोरा पोचवून तंबी करतील.' -इम २६० [फा झोर्]

जोरावणें—अक्रि १ (अक्षरश व ल०) बळावणें, समर्थ, शक्तिमान, पराक्रमी, तेजस्वी होणें २ जुलमी होणें, माजणें 'जोरावले वन करी धडकास देती '-अर्वाचीन (खरे) ४५६ ३ जोराचा होणें (वारा, पाऊस, मनोविकार, रोग). 'झरझर चला, पाऊस जोराव ल्यावर मजल आटोपणार नाहीं' ४ जोरानें वाढणें, फोफावणें, 'पाणी मिळू लागताच झाड जोरावलें' ०वर-वार-वि १जोरदार बलवान, समर्थ 'मालोजी जोरावर।'-मञ्च ३१४ २ जुलमी, जबरीचा, जबरदस्त. ०वरी-वारी, जोरावा-स्त्रीपु १बळजबरी, जुलूम, जबरदस्ती 'आपणावरी जोरावरी करिताती '-रा २०. ४० २ पाठपुरावा, पाठबळ, मदत [फा झोरावर्]

जोरी—स्त्री ज्वारी, जोंधळा पहा [प्रा जोवारी, म ज्वारी, हिं जोरी]

जोरी—स्त्री. जुलूम, जबरदस्ती, धुडावा 'विलेकरी जोरी करितील '-राज १६ ३४. बळजोरी शब्दात हा शब्द येतो -वि (बुद्धिबळाचा खेळ) पाठिंबा किंवा जोर दिलेलें, दणारें (प्यादें) या डावात एका बाजूनें दुसऱ्याचें जोरात असलेलें प्यादें मारावयाचें नसतें [फा थोरी=बल]

जोरी—स्त्री (गो) तापाची साथ [स ज्वर]

जोरू—स्त्री स्त्री, पत्नी, बायको [जोड, हिं जोरू] म्ह० (व) जोरू सात, पैसा गाठ=नेहमीं पैसा गाठीला लावावा व बायको बरोबर असावी

जोर्णे—(गो) पाऊस पडतवरीं पेरण्याची शेती जाणें पहा

जोल—स्त्री (प्रा) जमणें, सानणें शाभणें जुळणें जालीचा-वि मिलाफी, जुळणारा, योग्य धगणारा शाभणारा

जोलल—न (व) लाटेचा आपट [का जोल्लु=लाट]

जोव—स्त्री (राजा) वीन [स जव यु, द. प्रा जोईन्=बीन]

जोवणें-अक्रि. (राजा) बीज चमकणें [जाव, म योतन]

जोवणी—स्त्री (राजा) जोखडाची दिवळ, खुटी, खीळ [जू+अडवणी ?]

जोवणें—अक्रि (राजा.) दाटी जमणें, होणें, घोंगावणें (माशा, मुग्या इ०) [सं योजन, प्रा जोअण=जोडणें]

जोंवर-वरी, जोंवरीं—क्रिवि १ जोंपर्यंत, त्यावेळेपर्यंत २ यावत्काल, जितका वेळपर्यंत [स यावत्]

जोवाल—स्त्री (राजा) जमीन भाजणें, टहाळे तोडणें इ० शेतीचें सर्व काम करण्यासाठीं अनेक शेतकऱ्यांचा जमलेला समूह, अनेक शेतकऱ्यांनीं एकवट काम करणें, डाळें साप ३ पहा [जोवणें=एकत्र जमणें]

जोव्हारी— पु जोहरी पहा

जोश-ष-स—पु जोम, जोर, आवेश, वेग [फा जोश्]

जोशी-सी—पु १ पचाग, कुंडल्या समजून गावात साग णारा, ज्योतिषी, भविष्य वर्तविणारा, भिक्षुकी, जोसकी कर णारा ब्राह्मण (विशेषत धंदेवाईक), ग्रामजोशी पूर्वी ही वृत्ति असे व जोशाला गावात वतन देण्याचीहि वहिवाट असे २ एक कुणब्यातील जात, बुडबुड जोशी (कुणब्यातील), हे सह देवी मताचे मुहूर्त, ज्योतिष जाणतात ३ वगळ्याच्या जातींतील एक पक्षी, कुरुकुंभा [स ज्योतिषी, प्रा जोइस, जोइसिअ]

जोसकी, जोसपणा, जोसपण—स्त्रीपुन गावजोशाची वृत्ति, धंदा, वतन जोसगंड-पु जोशास निंदार्थी म्हणतात

जोहनळा—पु (महानु) जोंधळा पहा 'शिशुपाळ सैन्याचे जोहनळें। पीटु करीत एकें वेळें। उखळीं वसुधेच्या।' -शिशु ९१४ [स यावनाल, देश्य जोण्हलिया, हिं जोन्हरी]

जोहर—पुन १ अग्नि 'जोहरीं रखील सपातें।'-मुआदि ९७१ २ (ल) संकट 'मला सत्य घालील कीं जोहरीं तो।' -किमु ८८ ३ लाक्षागृह -ज्ञा ११ ६० 'येहीं लाक्षाजोहर रचिलें।' -गीता १ २३६१ [फा जोहर=अभिदिव्य किंवा जहर ?]

जोह(हा-हो)री—पु १ सराफ, जव्हरी, जवाहिऱ्या, रत्न परीक्षक 'जैसा रत्नामाजी जोहारी। रत्न पारखी आपुलें।' -मुआदि ४१ १०१ २ जुना जरतार विकत घेणारा, जरीपुराना वाला ३ आरसा, फण्या, चरकी माळी इ० जिन्नस विकण्यासाठीं दारोदार फिरणारा, अशी जात -शास्त्रीको ४ (व.) मणी, गोंवळी विकणारी एक जात [अर जौहरी]

जोहळा जोहया, जोहा, जोहा—पु (ना) जोंधळा पहा

जोहा(ह)र—न १ जवाहिर रत्नें इ० 'भागावर जोहार फार सुरेखे। वर्नी जणू पक्ष तरु फुलले।' -होरा १३५ २ जवाहिऱ्याचा धंदा सराफी [अर जौहर]

**जोहार**—पु नोकर लोक राजाला वंदन करितांना हा शब्द हे वीरा या अर्थी म्हणतात 'रायासि जोहार करुनि उचित स्थानिं बैसविला'—पच १ १६ 'प्रजा येउनी राजसभे। जोहार करुनी राहिले उभे।'—मुहरिश्चंद्राख्यान ६६ (नवनीत पृ १८६) महार, चांभार वगैरे आपसात किंवा वरिष्ठांना नमस्कार करितांना हा शब्द योजतात 'जोहार जी मायबाप जोहार।'—तुगा ३३६ [स जयहर, योद्धार, प्रा जोहर] **जोहारणें**—अकि वंदन करणें 'मग जाऊनि बंदीजन। जोहारिला नृपनंदन'—कथा ६ १५ २२ [फा जोहर]

**जोहार**—पु १ निकराच्या वेळीं आपल्या बायका-मुलांचा नाश करण्याचें हिंदु वीरांचें कृत्य रजपूत लोकांत बायका अग्नि प्रवेश करीत २ अग्निपात होणें 'कपि जोहार जालें'—भाए १०१ [फा जौहर=अग्निदिव्य]

**जोळ**—स्त्री (गो) जळू (प्राणी) [जळू]

**जोळक**—न (कु) माडाची बाग

**जोळी**—स्त्री १ (गो) आतडें २ (ठाणें) नांगराला बैल जोडण्याची दोरी —बदलापूर २८७

**जोळोंय, जळोंय**—पु (गो) जळण, सरपण [स ज्वल्]

**जोंळळ**—वि (वि) पोल (भाताचें) [का जोळ्ळु=पोल-पणा, अर्थहीनता]

**जोश्नीकनू**—क्रिवि (रा) फुरसतीनें

**जों**—क्रिवि जव, जोंपर्यंत [स यावत्]

**जौजा**—स्त्री पत्नी, स्त्री, जवेंत पहा 'राधा जौजे माधव= माधवाची पत्नी राधा' [अर जौजा=बायको]

**जौंजार**—पु त्रास, कटाळा, जोंनार पहा

**जौनपुरी**—पु (संगीत) एक राग यांत षड्ज तीव्र ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम पंचम, कोमल धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात आरोहांत गांधार वर्ज्य जाति षाडव संपूर्ण वादी धैवत संवादी गांधार, गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर [जौनपूर गांव]

**जौस, जौसगी**—वि (नदभाषा) उत्तम चांगलें जोस-प पहा 'जौस लुगडयांना किंमत फार पडते'

**जौहर**—पु बायकामुलांना जाळून मारण्याची रजपुतांतील एक चाल जोहार पहा

**जौळ**—न १ (कों) अभ्र अभ्राच्छादित आकाश २ (राजा) सपाटयाचे वादळ जोराचा वारा याचा वेग दर ताशीं ५० मैल असतो [फा जौगान्-फिरता?]

**जौळी**—वि १ वादळी तुफानी (हवा, वारा) २ वादळाचा परिणाम न होणारें, त्याला तोंड देण्यासाठीं तयार केलेलें (तारू)

**जौळ**—न (मद्रास) समूह 'आनंदरसाचें जौळ।'—भाए ६६१ [सं जाल]

**ज्यहान, ज्यहानपन्हा**—जहान इ० पहा

**ज्यहांगिरदार, ज्यहांगीर, ज्यहांबाज, ज्यहांबाद, ज्यहांमर्द**—जाहगिरदार, जाहगीर, जहांमर्द इ० पहा

**ज्या**—स्त्री, १ धनुष्याची दोरी. २ पृथ्वी ३ जीवा, एक ज्या, वर्तुळाच्या परिघातील कोणतेहि दोन बिंदूस सांधणारी सरळ रेषा [स]

**ज्याचा**—जो संबंधी सर्वनामाचें षष्ठीचें पुल्लिंगी एकवचनी रूप ०तो-एकएकटा प्रत्येक माणूस स्वतंत्र 'ज्याचा तो पडला शहाणा, मग दुसऱ्यांनीं काय शिकवावें?' ०त्याला-सर्वांना प्रत्येकाला 'ज्याची त्याला काळजी पाहिजे, दुसरा किती पाहील?' **ज्याचें नांव तें**-भगदीं मुळींच बिलकूल 'तिला त्याबद्दल मीं पुष्कळ गळ घालू पाहिली पण ज्याचें नांव तें हिचें एकच उत्तर'—मूप **ज्यांत त्यांत**-प्रत्येक कामांत, प्रकरणांत 'ज्यांत त्यांत तोंड घालणें बरें नाहीं' म्ह० ज्याचें करावें बरें तो म्हणतो माझेंच खरें=उपकारकर्त्यानें सांगितलेली आपल्या हिताची गोष्ट न ऐकणें

**ज्यादम**—न (गो) जाजम

**ज्यादा, ज्यादुगिरी, ज्यादू, ज्याफा, ज्यास्त**—जादा, जादुगिरी इ० पहा

**ज्यान, ज्यानजवान, ज्यानज्वानी ज्यानीजवानी**—जवान इ० पहा

**ज्यान फाइदा**—पु तोटा, नफा [फा जियान्=तोटा+ फायदा]

**ज्यापक्षीं, ज्यापेक्षां**—क्रिवि कारणासाठीं, कारण कीं, असा करिता याच्या उलट त्यापक्षीं त्यापेक्षां

**ज्याफत**—स्त्री मेजवानी, जाफत पहा 'रसिडेंटामहीं त्यांनीं आपले येथें ज्याफतीस आणिलें होते'—तीप्र ८३ [अर झियाफत्]

**ज्याफल**—न (गणित) ज्यापासूनचें अकरूप फल, वर्तुल चापाचें माप, धनुष्फल [स]

**ज्याबी(बु)द**—वि सुरक्षित शाबूत, नादुरुस्त नसलेले [अर शाबीत]

**ज्याम**—वि (गो) दुर्बल अशक्त

**ज्यामिति**—स्त्री (भूमिति) भूपरिमाण भूमापन भूमिति पृथ्वीचें क्षेत्रफळ [स ज्या=पृथ्वी+मिति=मोजणें]

**ज्यार**—वि बिमार हैराण, बेजार जार पहा 'भाल्याच्या अग्नीनें इंग्रज ज्यार केले'—होपो १३ [फा झार्]

**ज्यारत**—स्त्री पवित्र स्थानास भेट यात्रा जारत पहा 'पिराची ज्यारत करून'—दिमरा १ २४७ [फा जियारत्]

ज्यारी—जि चारू जागी पहा

ज्यालें—न जीवित जन्म जगणें, निभावणें 'प्रिय प्रिय माझें ज्यालें।'—गीता १०.६४ ०पण—न जन्म आयुष्य

ज्याहा(हां)गिरदार, ज्याहागार, ज्याहांबाज—जाहगिरदार इ० पहा

ज्याहा—क्रिवि (राना) जेथें

ज्युर्दा—स्त्री (गो) अंगरखा

ज्युबिली—स्त्री महोत्सव आनंदोत्सव एखाद्या गोष्टीस, एखाद्या व्यक्तीस २५, ५०, ६० वगैरे अधिक वर्षे झाली म्हणून करावयाचा उत्सव [इं]

ज्युस्ताज्युस्त—वि (गो) नीटनेटका बरोबर [पोर्तु हे ज्युस्त इ जस्ट]

ज्यूरी—स्त्री पंच, पंचायत ज्यूरी पहा [इं]

ज्येष्ठ—पु हिंदु वर्षातील तिसरा महिना —वि १ सर्वांत वयानें मोठा वडील (भावंडामध्यें) वयानें थोर २ उत्तम उत्कृष्ट श्रेष्ठ [स] ज्येष्ठलय—पु (ताल) विलंबित लय पहा ०वार साचा कायदा—ज्येष्ठाधिकार पहा (इं) प्रायमॉजेनीचर लॉ ०मंगल—न विवाह किंवा उपनयन संस्कार [स] ०मध ज्येष्ठीमध—पुस्त्री एक औषधी वनस्पतीचें मूळ हा गोड असतो याचा अर्क खोकल्यावर देतात ०घड—स्त्री ज्येष्ठाचा काल सबंध ज्येष्ठ महिना (आठवडा पंधरवडा यासारखा वनलेला शब्द)

ज्येष्ठा—स्त्री सत्तावीस नक्षत्रापैकीं अठरावें नक्षत्र [स] ०कनिष्ठा—स्त्री १ समुद्रमथनातून निघालेल्या दोन बहिणीपैकीं वडील (ज्येष्ठा) ती लक्ष्मी आणि धाकटी (कनिष्ठा) ती अलक्ष्मी होय काहींच्या मतें फक्त लक्ष्मीच समुद्रमथनातून निघाली त्या वेळीं तिला ज्येष्ठा म्हणत व तिचें विष्णूशीं लग्न लागल्यावर तिलाच कनिष्ठा म्हणूं लागले २ वरील बहिणींच्या पूजेचा दिवस भाद्रपद शुद्धांत ज्येष्ठा नक्षत्र ज्या दिवशीं येतें तो दिवस [स] ०गोर—गौर—गौरी—स्त्री एक देवता भाद्रपदांतील ज्येष्ठा नक्षत्रीं हिची पूजा करितात ज्येष्ठांश—पु ज्येष्ठ भावापेक्षा सर्वांत वडील भावास वडिलार्जित मिळकतीचा सर्वांत जास्त हिस्सा मिळावयाचा हक्क सध्या सगळ्याच भावांना समसमान हिस्सा मिळतो ज्येष्ठासन न महान माइनें मोठ्या माणसास ज्यांत यावयाचा मानपान किंवा महा सुनेच्या लग्नप्रसंगीं मान्यता जावयास सासऱ्याकडून जो मानपान व्हावयाचा तो ज्येष्ठ जावयाची पूजा [स]

ज्येष्ठी—वि ज्येष्ठ महिन्यांतील (पौर्णिमा) [स]

ज्यैष्ठ्य—न १ वडिलपणा वडीलकी २ श्रेष्ठत्व वर्चस्व [स]

ज्योतिष—न १ ज्योतिःशास्त्र ग्रहांची गति जाणण्याची विद्या सामुद्रिक व ग्रहज्योतिष २ ज्योतिषाचा उद्योग व धंदा जोशीपणाची वृत्ति जोसकी [स] ०चक्र—न नक्षत्रगोल [स]

ज्योतिषी—पु १ ज्योतिःशास्त्र जाणणारा ज्योतिर्विद्यावेत्ता २ फलज्योतिष सांगणारा, जोशी गणक 'पढोनि मुहूर्तचिंतामणि। जाला ज्योतिषी ब्राह्मण।'—मन ४३० [स]

ज्योतिष्टोम—पु १ ज्यास सोळा ऋत्विज लागतात असा एक यज्ञविशेष, अग्निष्टोम २ (विनोदार्थी) मोठा घोळ, जंगी तयारी असणारें काम [स ज्योतिस्+स्तोम]

ज्योतिष्मान्—वि तेजस्वी तेजःपुंज, स्वयंदीप्त, सुंदर प्रकाशमान [स]

ज्यो(ति)ती—त—न १ जोत पहा उजेड तेज चकाकी प्रभा, प्रकाश २ वात ३ (काव्य) रूप 'तुका म्हणे होती। तुझी माझी एक ज्योति।'—तुगा ३७७२ ४ पाणी तेज (रत्नाचें) 'तैसीच हिऱ्याची ज्योती।'—यथा २.१४० [स ज्योतिस्] ०रूप—स्वरूप—न प्रत्यक्ष प्रकाश स्वयंसिद्ध प्रकाश परमेश्वरास हा शब्द लावितात ज्योतिर्लोक—पु आकाशांतील नक्षत्रलोक [स] ज्योतिर्लिं(लिं)ग—पु शिवाचें लिंग हीं १२ आहेत बारा ज्योतिर्लिंग पहा 'सत्य ज्योतिर्लिंगें बारा। प्रातःकाळीं स्मरण करा।' भूपाळी ज्योतिर्लिंगाची पृ १० ज्योतिर्विद्या—स्त्री ज्योतिःशास्त्र ज्योतिःशास्त्र—न सूर्यचंद्र ग्रहतारे इ० आकाशांत संचार करणारे दिव्य पदार्थ अथवा ज्योती यांच्या वास्तविक व भासमान स्थिती व गती, त्यांचीं वास्तविक स्वरूपें, आकार व घटना इ० गोष्टींविषयीं अवलोकन व अनुमान यावरून होणारें ज्ञान हा ज्याच्या विवेचनाचा विषय असें शास्त्र खगोलशास्त्र, फलज्योतिषशास्त्र [स]

ज्योत्स्ना—स्त्री चांदणें चंद्रप्रकाश कौमुदी [स]

ज्वर—पु ताप पुढें दिलेल्या शब्दासंबंधानें वैद्यामध्यें फार मतभेद असल्यानें ते येथें सार्थ दिले आहेत ज्वराचे प्रकार—ऐकाहिक ज्वर—१ रोजच्या रोज येणारा ताप २ एकामागामागून चढउतार होणारा ताप द्व्याहिक ज्वर—१ दोन दिवसांच्या अंतरानें येणारा ताप २ रोज दोनदा भरणारा ताप ३ फक्त मध्यें एकच दिवस न येणारा ताप त्र्याहिक ज्वर=१ तिसरे दिवशीं येणारा (मध्यें दोन दिवस अगदीं न येणारा) ताप २ प्रत्येक तिसऱ्या दिवशीं येणारा ३ तीन दिवस सतत येणारा चातुर्थिक ज्वर=चवथ्या दिवशीं येणारा ताप आता माधवनिदानाच्या मतें—एकाहिक—चढउताराचा ताप द्व्याहिक=एक दिवसाआड येणारा ताप त्र्याहिक=दोन दोन दिवस सोडून येणारा ताप चातुर्थिक=चवथ्या दिवशीं येणारा (यावद्दल मात्र सर्वांचें एकमत आहे) मात्र सतत-

ज्वर व सन्तत ज्वर यांत अर्थभेद आहे. सन्ततज्वर=चढउतार होणारा ताप. ज्वरसंताप=प्रसारशील ज्वर, जनपद=रोग भरणारा ताप. ०एर दिक्‌ज्वर [स] सन्निपात ज्वर—०पाच(चा)या–पु १ ताप निघाल्यावर रोगास ज्वराविषयास लागल्यावर पुन्हा उलट येणारा ताप. पाचावा पहा. २ दृष्टीने उलटलेला ताप. ०विपाक—पु तापाचा भर एक वारास असलेला ताप. विपाक पहा. [सं] ०सूति–स्त्री तापाच्या गुर्मीमुळे पडणारे रक्त, होणारा श्वास. [स] ज्वरांकुश–पु तापावरील एक औषध. [स] ज्वरातिसार–पु तापावस्थेतला अतिसार, हगवण. [सं] ज्वरांश–पु तापाची कमर, कणकण. तापाची लक्षणे. [सं] ज्वरित, ज्वरी–वि ताप आलेला. [स]

ज्वल —वि जहालापेक्षा जास्त, सरकारविरोधी, कडक. (इ) रॅडिकल —सुध [सं]

ज्वल —पु १ जळणे, दहन. २ विस्तव, अग्नि. ३ जळजळ, जळफळाट [स]

ज्वलित—वि १ जळत असलेले. २ जळलेले, दग्ध झालेले. [स]

ज्वल्प—वि १ लेप, संताप, क्रोध, राग. २ दुर्गंधि, घाण. ३ भीति, धाक, भयाची प्रबळ भावना. [जल्प]

ज्वात—न (कु) औत, जोत पहा.

ज्वान, ज्वानकट्टा, ज्वानपट्टा, ज्वानमर्द, ज्वानमर्दी, ज्वामर्दी, ज्वा(नि)नी, ज्वानादिवानी—जवान इ० पहा. 'अशी तारुण्याचा कहर, ज्वानीचा कहर, मारित लहर, मदा तलवार।'—राला ११३ [फा जुवान्–नी, स यौवन]

ज्वामर्द, ज्वामर्दी—जवानमर्द–र्दी पहा.

ज्वार, ज्वारी—स्त्री जोंधळा पहा. [हिं ज्वार] ०भड कणें–(व) ज्वारी वाळणें.

ज्वाला, ज्वाळ–ळा—स्त्री ज्योत, जाळ, अग्निशिखा, जळत असणारा विस्तव. [स] ०ग्राही–वि जळणारें, जळण्याला योग्य, जलद पेट घेणारें. [स] ०पटल–न ज्वालांचा समुदाय, आगीचा लोट, आगीचा झोत. [स] ०माळी–पु अग्नि. [स] ०मुखा–पु पृथ्वीच्या पोटातील उष्णतेमुळे वायु व रसरस ज्या पर्वताच्या तोंडावाटे बाहेर पडतात तो पर्वत. —स्त्री एक देवी. हिच्या मुखातून ज्वाला निघत असते.

# झ

झ—वर्णमालेतील नववें व्यंजन. याचे ज या वर्णाप्रमाणें दोन उच्चार आहेत. एक तालव्य. उदा० झिरपणें, झकार व दुसरा दंततालव्य. उदा० झर्‍यो, झगा इ० अक्षरविकास—या अक्षराची जैन व दक्षिणी अशी दोन वळणें आहेत. प्रस्तुत वळण दक्षिणी आहे. या वर्णाची पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार शिलालेखांत, दुसरी पुलुमावी याच्या लेखांत, तिसरी राजाशिवगणाच्या कोटा लेखांत (सन ७३८) व चौथी अवस्था इ. सन ११ व्या शतकांतील एका हस्तलिखित पुस्तकांत सापडते. याच्या अवस्थेतील झ चवथी पासून तयार झालेला दिसतो.

झऊल—वि (ना) (नशिट) लफंगा, थापेबाज. ०पणा–पु (ना) थापेबाजी, लफंगपणा.

झक—स्त्री १ (या शब्दाचा निराळ्या अर्थी उपयोग होतो पण मूळचा अर्थ म. झष=मासा यावरून निघाला असावा) मासा. २ (ल) वाईट गोष्ट, नियमर्म. [स झष=मासा, हिं झक=मूर्खपणा, पागलपणा, स. झष्=मारणें, दुखविणें, अर झक्=फसविणें] (वाप्र) ०मारणें–(अशिष्ट) १ ढोबळ चूक करणें, मूर्खाप्रमाणें वागणें. २ नियकर्म, व्यभिचार इ० करणें, लोकसंप्रदायाविरुद्ध वागणें 'तो आईबापाचें ऐकत नाहीं झक मारतो.' ३ कधी नव्हे ती गोष्ट करणें असें कबूल करणें किंवा कबूल करून तिच्याबद्दलचा दोष आपल्या पदरात घेणें. 'मी तुमच्या नादाला पडलों, यात झक मारली (एखादी गोष्ट) झक मारीत झक(क)त करणें–जाणें–देणें–येणें– इ०हा नमताहि नाईलाज म्हणून करणें–जाणें इ० आपसुख, चुपचाप करणें इ० 'या भरवशानें दवडिलें लुधा। येईल झकमारत म्हणोनि।'—दावि ४४० झकत पहा. झकमारीत राहणें–भीक मागणें नाइलाज म्हणून हात चोळीत बसणें, खोळंबत राहणें 'मागें दौलत किती स्वामीचें स्वामी घेतील. कर्जदार झक मारीत राहतील'—ख १७०७ [तुर्क० अर झकात=भिक्षा] झक मारून झुणका खाणें–(क) झकमारणें. मूर्खपणा करणें, यांचे ग्राणखादि ग्राम्य अर्थ आहेत.

झक—स्त्री झाक, चमक, दिपविणारा प्रकाश. 'झक पडे नयनीं। जाय निघोनि।'—दावि १७८. —वि झक, भपकेदार, चकचकीत, झगझगीत, लख्ख. 'झळकत झक झळ घनदामिनी।'—दावि ४९१. [ध्वनिसादृश्यावरून अनुकरणवाचक शब्द. स चकम्, चक, हिं झक साफ चकचकीत, चमक झाक] ०दिशी, ०कन–फर–दिनीं–दिशीं–क्रिवि एकदम चमकून, तेज पाडून, चकाकत, लखकन.

झककणें—अक्रि चळकणें, झकाकणें, चकाकणें 'सायकाची आकृती। हिरेजडीत झककती।'—ह ३४ ११८ [झक हि]

भारी पानवाद्याला डावातील सर्व पानें छ्यावयाग लावण्याची क्रिया शब्द या अर्थी सुरीचा प्रयोग 'दुर्गी टाक म्हणजे झवळूची ब्याद टळेल' ३ (अश्लील) मैथुन, स्त्रीसंग, संभोग

झगझग, झगझगणें, झगझगाट, झगझगीत, झगझगी—झगझग इ० पहा.

झंगट—न एक वाद्य, ताम जेंगट पहा 'तूं प्रथम झंगट वाजीव' —वाय १७ [ध्व]

झगट—न झगाड, भानगड, झंगट पहा.

झगटणें—उक्रि. १ जोरानें पकडणें, धरणें, कवटाळणें २ जोरानें घुसणें, घासणें ३ झाडणें, झटकणें 'हस्तीं झगटी वनरी भार।' —नव २०.१८ —अक्रि. १ जोरानें झोंबणें, चिकटणें दाबणें रेटणें, भिडणें, चिकटणें 'झगटियें झगटी। पण चाच केली।' —ज्ञा ५९४ २ झगडणें, भाउणें (एखाद्यावर) चालून जाणें जाताने हल्ला करणें, तुटून पडणें, भिडणें, वाद करणें, अद टणें पहा 'मेह माझर झगटले। तैसे रथ अतिशय टगटे।' —एरुस्व ११.२४. ३ जडणें, वेधणें 'माझ्या स्वरुपीं लागलें मन।' —एभा १४ १६२ [ध्व हिं झगडा, झगडणें पहा]

झंगट—स्त्री १ तारा, वाद्य जेंगट पहा. २ वाद्याचा गजर, कडकडाट (क्रि० उठणें, लागणें), गोंगाटानें युक्त असें भांडण, वादविवाद, कल्लोळ, गोंगाट, खडाजंगी (क्रि० लावणें, माडणें चालणें). ३ (व्यापक) (मेजवानीतील पदार्थ, गाणें, वाजवणें, नाचणें इ० काची) विपुलता, धमाल, लयलूट —क्रिवि जोरानें, मोठ्या आवाजानें, कल्कलाटानें, दणदणाटानें (ततुवाद्यें इ० वाजणें) 'झगट झगट नौबत वाजे। तें एवेच साजे।' [ध्व]

झगडणें—अक्रि १ भांडणें, तंटा करणें, वादविवाद करणें, झुंजत घालणें, लढणें २ बिलगणें, झोंबणें, झगडणें [द प्रा झगड=भांडण, का जगळ, हिं झगडना, सिं झगिडो]

झगडा—ड—पुस्त्री १ तंटा, भांडण, कलह २ कज्जा, मुकद्दमा खटला ३ लढाई, युद्ध 'तो दुःशासन राया सहदेवा बधुसीं करी झगडा।' —मोकर्ण ९.६ ४ (नाटक) दोन पात्रांवर सगीत वादविवाद, सवाद, झकड 'अशा पुस्तकात सगीत झगडे .. सैंगीत छकडी पाहिल्या आहेत' —सगीतघोटाळा ५ ५ (ल) एकरूपता, मिश्रण 'रानहमापुढे। चाचूचें आगळें। तोडी जेवीं झगडे। क्षीर नीराचे।' —ज्ञा १४२०७ [ध्व प्रा झगड, का जगळ, हिं झगडा, गु झघडो, सिं. झगिडो]

झगडाऊ—ळू—वि भाडखोर, भांडकुदळ कलहप्रिय, तंटखोर ०झगड—स्त्री १ भांडाभांडी (सामुदायिक, सार्वत्रिक), जोराचें भांडण कज्जा २ मुकद्दमा, खटला ०रगडा—पु खडा जंगी, धडकापडकी, गलबलानें युक्त असें मोठें भांडण [झगडणें+रगडणें]

झगडी—स्त्री भांडखोर, तंटखोर, भांडकुदळ. 'वासनावायरी शेजारीण। झगडी कुचीळ मोठी दारुण।' —भज २१

झगडेखार—वि (गो.) भांडणारा, तंटेखोर, कलहप्रिय [झगडा+करणें]

झगमग—स्त्री १ चकाकी, लकाकी, झगमग पहा 'दीपाचिया झगमगा। जाळील हें पतगा।' —ज्ञा १३ ७४० —वि लखलखीत, चकचकीत —ढार [अनु द्वि]

झगमगणें, झगमगी, झगमगीत, झगागणें, झगागी, झगागीत—झगझग इ० पहा

झगमगणें—अक्रि झळकणें 'केशर कस्तुरी भारी झगमगिताहे।' —मप्र ४ १७

झगमगी—स्त्री चकाकी, तेज 'दसोनि दीपरूप झगमगी। उपभोगबुद्धी पतगीं।' —एभा ८ ८९

झगमगीत—वि तेजस्वी, तेजपुंज 'त्रयोदश वर्षे रजनीत। झगमगीत होते पैं।' —पाप्र ३६.३३

झगरे—री—स्त्री १ पदविलेल्या गोवऱ्याचा, खरखरीत निखाऱ्यांचा टीग (स्वयपाकासाठीं, शेकण्यासाठीं), २ (चि) थोडासा विस्तव असलेली तप्त राख ३ (सामा) शेगडी, आगटी 'शतातून शतसरी लोक शीतनिवारणार्थ मोठमोठ्या झगऱ्या पेटवून सभोंवतीं बसले होते' —मौनयौवना, आवृ २. पृ २१५ [ध्व झग=अग्निप्रकाश धग=विस्तव]

झगलें—न लहान मुलांचा झगा, झबलें [झगा अल्प हिं झगुली]

झगा—पु १ पायघोळ आगरखा 'फाळी येकला निजगा। अंगीं विवरा झगा।' —मव्व ३१ २ मागें गुड्या असलेला व कमरेजवळ चुणया असलेला मुलींचा गळ्यापासून पायापर्यंतचा परकर राजव्यवहारकोशात याला प्रतिशब्द कबुची असा दिला आहे —राव्यको २ ७५ [अर जुब्बा, फा जुगा, तुल० स झगू=झाकणें]

झगागी—स्त्री झगी, झकाकी पहा

झगाझोरी—स्त्री (माण) ओढाओढी, ओढ्याओढ्वी

झगार—न १ पावसाची अंधारी मळभ आभाळ, मेघाचें अवडबर (क्रि० येणें उठणें, निघणें घालणें) २ अभ्रपटल, ढगाचा समुदाय मोठा ढग ३ पावसाची सर (क्रि० पडणें)

झगी—स्त्री चकाकी, तेज झाक, झकाकी 'नेत्रीं का शिंपीचे अगीं। जडली रुपेपणाची झगी।' —एभा १२ २३९ [झग—ग]

झंजर—पु (गो) घुंगुर. [ध्व, सं झर्झर प्रा झञ्झर=वाद्यविशेष]

झंजळणें—अक्रि. (व) रागावणें, सतापणें [सं प्रा झंझा]

झंजा(झा)पवन-मारुत-वात-वायु-समीर—पु पर्ज न्ययुक्त वादळ, सोसाटयाचा वारा, वादळ, वावटळ, अतिशय जोराचा, गर्जना करणारा वारा, तुफान 'जैसा प्रकटतां झंजामारुत। जलदजात विटुळे' –ह १२०. 'शिरला कौरवकटकीं जैसा झंझागमीर रहनिवर्गी।' –मोभीष्म ७१६ [स झंझा=वाऱ्याचा, पावसाचा आवाज, वादळ+मारुत=वारा]

झंझट—न (ना) झंगट लचाड, झुगराट व्याद [जंगट पहा]

झंझणा—पु (व) पंखा, विंझणा [स वीजन, म विंझणा]

झट—न. लचाड, लोढणें लिगाड, खोडी, झेंगट उपाधि, पाठलाग (मनुष्य, प्रसंग, स्थिति यांचे उपयोग) इतर अर्थी लचाड पहा 'मत्स्यनाथ म्हणे आलें होतें झट। परशरामभट दवा वाटे।' –म र ७६ –स्त्रीन १ आघात, धक्का धुमणी टोला लिगाडा, प्रहार (क्रि० लागणें) 'आदळतां मोहाची झटें। ज्याचा बोध कदा न पालटे।' –एभा २१३१० २ (व) ठेंच टक्कर [स घट्-संघातें] ०घेणें-(व) चालून येणें, विनाकारण आरोप करणें ०लावणें-(व) कटाळा यईपर्यंत गप्पा मारणें

झट झटसा—क्रिवि. लौकर, त्वरेनें, जलदीनें, झटकन झुटकीसरशीं 'तेव्हां भीम उठोनी गेला बाहेर तूर्ण झटसा रे।' –कीर्तन ११८ [सं झटिति, हिं गु झट ध्व] ०कन-कर-दिनीं-दिशीं-क्रिवि लौकर, जलदीनें, त्वरेनें चपलत, लगबग झटझट, झटझटा झटाझट टां, झटाटा-क्रिवि झटकन पहा चपलतेनें, एका क्षणात, झटक्यासरशीं, लौकर लौकर, पटपट 'चला झटपटा वोसडुनि वाट। पटरी मूळ पीठ दूरी आहे।' –व ४५८ 'तो शतश पट झटपट फेडुनि भागे सभेंत वेडावे।' –मासभा.५८९ [ध्व झट् द्वि]

झटक—स्त्री १ चटदिशीं जाऊन परत येणें फेरफटका फेरा, य जा (क्रि० मारणें) २ झटका, झटकारा, फटकारा तडाखा (क्रि० मारणें) 'हासें देखोनि मातें झटक उठविता काय सांगू कपाळा।' –आह २९ [ध्व झट्]

झटकणें—अक्रि १ सटकणें, झटाडणें झटकन् निसटणें, २ (व्यायापासून) विभक्त होणें निराळें राहणें संबध तोडून वागणें, तुटक वागणं (या अर्थी हें क्रियापद सामान्यत फटकणें या क्रियापदाला जोडून येतें उदा० झटकून फटकून राहणें असणें) [झटक]

झटकणें, झटकाविणें—उक्रि १ झाडणें (वस्त्र) २ कपडानें वाहून गारणें, फटकारा मारून, हिसका देऊन झाडणें ३ (धान्य, अग्नि इ० वर) वारा घालणें फोल, कोंडा इ० निघे असें करणें, पाखडणें. ४ पंखा इ० नें वारा घालून अग्नि प्रज्वलित करणें ५ हिसडणें, हिसडा देणें, झटका देणें, झाटणें (हात पाय इ०) 'कमीग हटके हलके झटके विजयी भवानी तलवार।' –हिरकणी, स्वातन्त्र्य शार्दूल [झटक, हिं झटकना, गु झटकवुं]

झटका झटकारा—पु १ (काठी इ० काचा) तडाखा, फटकारा, रपा, आघात २ हिसका, हिसडा (हातानें, पायानें मारलेला) 'हातानें मारित झटका।' –मग्रामगीतें ४७ ३ (वेद नेचा, दुखण्याचा) आवेग, कळ, लहर, आचका, तिडीक, चमक, करक ४ (वाऱ्याचा) वेग, झपाटा, सपाटा, गोंसाटा ५ (राग, वारा, संताप इ० काचा) फणकारा, झणकारा ६ झपाटा (भूत, पिशाच्च इ० काचा) ७ झोंका, पाय मागेंपुढें होणें (नृत्यातील) ८ (हाताचा, शरीराचा) हेलकावा, हलावा, झोक, झोल ९ (शस्त्राचा) झपाटा, फटकारा, फेर, मंडळ १० वस्त्राच्या शेव टाचा फटका, फटकारा (क्रि० मारणें, देणें, बसणें) ११ (धान्य इ० सुपात घालून किंवा पंख्यानें) फटकण्याची क्रिया, झटपण, पाखडणें. (क्रि० देणें) १२ (एखादा पदार्थ दुसऱ्यावर आदळ-ल्यानें लागलेला) धक्का, धुमणी, आघात, (पडताना लागलेला) ठोका, मार (क्रि० लागणें) १३ (उन्हाची) झळ, तिरीप १४ (रोग, जरीमरी, साथ इ० काचा) घाला, सपाटा, धाड (तापाचा पित्तविकार) १५ (पिकावर पडणारा) तांबरा, मेंकाडा १६ (व्यापारातील) तोटा, धक्का, टोकर (क्रि० लागणें, बसणें, मारणें) वरील सर्व अर्थी 'झटकारा' शब्दापेक्षा झटका याचाच जास्त उपयोग रूढ आहे [ध्व झट, हिं झटका] सामाशब्द– ०फटका-पु १ सर्व अर्थी झटका पहा २ (पावसाची) जोराची झड, झडी, वादळी पाऊस ३ जोराचा सपाटा, दाब जोर, झोल, तडाखा ४ तगादा, नेट, लकडा (एखाद्या कामाचा, धयाचा) [झटका+फटका] झटकारणें–उक्रि. १ झटकणें, झाडणें २ हिसडणें, ओढणें ३ झिडकारणें, तिरस्कारणें धिक्कारणें [झटकारा] झटक्यापटक्यांत–क्रिवि एका झटक्यात क्षणार्धात, झट् दिशीं, झटक्यासरशीं [झटक+पटक] झटक्यासरशी-सरसा–क्रिवि १ फटक्यासरशीं फटकारा लागताच तडाखा बसताच २ एका हिसक्यासरशीं एकदम ओढताच ३ एका उडीसरशीं, उसळी सरशी–सरसा ४ जोरानें चपलतेनें झटकन ५ (रागाच्या सता पाच्या) फणक्यानें फणकाऱ्यानें झणकाऱ्यानें ६ एका आच क्यात एकदम एकाएकीं (प्राण जाणें मरून पडणें)

झटका—पु (तंजा म्हैसूर) एका घोडयाची छकडेवजा गाडी ही उंचीला कमी असून वरीच लांब असत

झटकाविणें—उक्रि झटकणें पहा ते आपलें उर पाण्यात बुडवून तीं भिजलेलीं पिसें धुळीवर झटकावतें '–मराठी ६ वे पुस्तक (पृ २५) ६ आ २

झटझोंपट—न (व्यापक) १ तटरसेडे, भांडाभांडी, भाडणतंट २ अडचणी, गिर्मे, संकटीं, लचांडें, पेंच, पेचाईनी. [झट+पोवट]

झटणें—अकि १ (एखाद्या गोष्टीविषयीं) नेटाचा प्रयत्न करणें, आटोकाट यत्न करणें, मनापासून श्रम घेणें, 'धरावा रायाचें भट झटत चेतांधि जाती।' –मोकृष्ण ६२ १४ २ (लढाईत, भाडणांत एखाद्याच्या अंगाशीं) भिडणें, झोंबणें, रगट करणें, तुटून पडणें 'तो गज गदाप्रहारें धृष्टद्युम्नें झटोनि लोळ विला।' –मोशल्य ३ ३७ [सं झट्=गुंतागुंत होणें]

झटपट—स्त्री १ त्वरा, घाई, जलदी, चपळाई, चलाखी (कामाची) (क्रि० घेणें, ग्यणें, धरणें, करणें) 'असें आटसावर करूं नको, थोडी झटपट धर' २ झटापट, चकमक, खडाजंगी हमरीतुमरी (क्रि० उडणें, होणें) 'स्पर्धा खटपट आणी चटपट। तन्हे झटपट आणी वस्वट।' –दा २.३ ७ –क्रिवि चपकन झटदिशीं, चटकन, तडकाफडकी, लौकर, [ध्व देशा झडप्पड=त्वरा] झटपटथा–वि चलाख, चपळ, झपाट्यानें काम करणारा [झटपट]

झटा—पु झटापट, झुंज झट पहा 'बोलके पहिलवान कळवंटे।तयासीच घ्यावें झटे।'–दा १९ ९ १९ [स झट्=संघात]

झटारणें—अकि लागणें, चिकटणें 'लोखंड परिसा झगटलें जेव्हां।'–व ४४६ [झटा पहा]

झटापट-पटी—स्त्री १ भांडण, कलह, रागाचा वादविवाद, झटपट (क्रि० उडणें, झटणें, लागणें, होणें, लावणें, करणें) २ घाटाळा, घाई, गोंधळ, धावदौड, धादल ३ स्पर्धा, अहमहमिका. [ध्व स झट्+पट्]

झटाळ—न झट, झेंगट, लचांड. झट पहा [झट]

झटा(ट्या)ळ-ळी—वि नाना तन्हेच्या युक्त्या, हिकमती, कल्पना लढविणारा युक्तीबाज, मसलत्या २ कजेबाजीपणामुळें अनेक लचांडें मागें असलेला, पेचात सापडलेला ३ झोंट, झोंड, निर्लज्ज, अप्रामाणिक ४ (व) गळघट, चिकट, चिवट 'ही आसामी झटाळ आहे' [झट+आळ प्रत्यय] म्ह० झटाळ गट आणि फटकाळ नगरी=मनुष्य किंवा स्थळ याची दुर्व्यसनता दाखविताना योजतात झटा(ट्या)ळी–स्त्री झटाळ माणसाची वृत्ति, धंदा झटाळपणा

झटें—न १ दोसणी, ओढाताण झोंबी, झुंज, झट पहा 'वनवीतीं कपाटें। डोंगरा दहनति झटें।' –ऋ ७९ 'अहो तान्हयाचें लागलें झटें। तयें अधिकचि पान्हा फुटे।'–ज्ञा ९ १८ २ (ल) ऐक्य, एकरूपता 'तव महाभूताची जवनिक फिटे। मग दोहींसि होय झटें।'–ज्ञा ६ ३०६ [झट]

झटेपटे, झटेपटटे—न अव झटापीट, उलसोड, दगदग, अटाआट, यातायात (क्रि० लागणें, घेणें, सापडणें) [झटपट]

झटेल-ली—वि. धावटपणाच्या, खोडकरपणाच्या गोष्टी कर प्याच्या परंतु, पूर्ण हिकमती, धाडसी, उत्पाती झटाळ, झटवाळ पहा [झट]

झट्टी—स्त्री (गो) १ नाटकाची तालीम २ परवचा, उजळणी

झड—स्त्री १ पावसाची एकसारखी वृष्टि, झिंबड, पाऱ्याना ठेलत पर्यंत, त्यावरून २ (ल) एखाद्या वस्तूचा सारखा वर्षाव (क्रि० लागणें, घसणें) 'भीमावरि न गणुनि नरवृष्टीची गड करी करी लाट।' –मोद्रोण २ ८६ ३ जोराच्या पावसाचे उडणारे तुषार वावझड, झिट ४ (ल) पावसाचे तुषार आत येऊं नयेत म्हणून दार, खिडकी, पागोळ्या इ० वावर बनविलेलें झडप, तट्या, पासोडी, छपर, दावरी (सुपारीच्या झाडाची चुडती) ५ (घार, गिधाड इ० हिंस्र प्राण्याची) झडप, झपेट झोंप ६ (ल) धाव उडी, झपडा (एखादी वस्तु मिळावी म्हणून घातलेला) उत्कंठेनें घातलेली उडी झेंप 'झडकरि झड घाली धाव पंचानना रे।' –रामदास, करुणाष्टकें (७ नवनीत पृ १७०) ७ एका वस्तूवर एकाच कालीं अनेकांची प्रवृत्ति (क्रि० घालणें, करणें, पडणें, लागणें) 'एकच विहीर पडली त्यामुळें सर्व लोकांची झड पडते' ८ (एकामागून एक येणाऱ्या गोष्टींची, माणसांची) माळका, परंपरा (क्रि० लागणें, पडणें) [ध्व प्रा दे झडी=निरंतर वृष्टि]

झड—स्त्री १ (डोक्याचे केस, झाडाचा मोहोर, पानें इ० यांचें एकसारखें) गळणें, पड २ (ल) (शरीराची क्षय इ० रानें होणारी) झीज, क्षय, क्षयरोग (क्रि० घालणें, लागणें, पडणें) [झडणें पहा]

झड—स्त्री त्वरा, जलदी, घाई, 'पश्चात देखु स्वौनीं। पातलामें झड करीनि।' –शिशु ७३६ [स झटिति, प्रा झडि]

झड—स्त्री झुंज, लगट, झोंबाझोंबी, हल्ला 'ज्याच्या शरीरबळाचें कोड। एकला लक्षावरी दे झड।'–एभा १७ १३९ [स झट्, म झट] झडे येणें–अकि लोमाविष्पणें मारो लागणें 'तो गुरु नव्हे भिकारी। झडे आलं।'–दा ५ २ २०

झड—स्त्री (गो) पिशाचबाधा

झड—वि (गो) हट्टी, झोंड, झट. हूड [झोंड]

झडकणें—सर्व अर्थी झटकणें पहा विशेषत झाडणें क्रियापदाच्या पुढें योजतात उदा० झाडून झडकून ठेव (धान्य, बिछान्य इ० घर)

झड-कन-कर-दिनीं-दिशीं—क्रिवि झडकन इ० पहा

**झडकर, झडकें**—क्रिवि झपाट्यानें -शार झडकन पहा

**झडकरी–करून**—क्रिवि (काव्य) लौकर, झटकन, जलदीनें, त्वरेनें 'ते वेळीं अर्जुन म्हणतसे देवा। आता झडकरी रथु पेलावा।'—ज्ञा १ १६९ 'सतोषोनि बोले रमारमण। भीमा येई झडकरून।'—ऐअ १०२१

**झडका**—वि क्षीण झालेलें रोडावलेलें, झडलेलें (शरीर, पानें) [झडणें]

**झडकारणें–कावणें**—झिडकारणें पहा

**झडगें**—न (क) भाताची एक जात

**झडझड-झडां**—क्रिवि १ जलदीनें, झरझर, घाईनें, लगबगीनें झम्झट-टा पहा 'उठोनि झडझड पळती जन।'—दावि ३१०. 'पीटतु सावरीतु आहे कासोडा। तेवींची चालत आहे झडझडा।'—उपा १८४७ २ धडधड, झडझड असा आवाज होऊन 'वायो झडझडा वाजे।'—दा १३ ९ ३६. [स झटिति, प्रा झडि, म झड द्वि.]

**झडझडणें**—अक्रि १ (एखाद्याच्या अंगावर) वसकन् येणें, वसवसा करणें, तिडतिडणें, खिसखिसणें (वर–शीं–अंगावर या शब्दाबरोबर प्रयोग) २ (एखाद्या कामावर) तुटून पडणें, झपाट्यानें लागणें [ध्व झट्=वृत्ति द्वि] **झडझडया**—वि १ (एखाद्यावर) वसवस करणारा, अंगावर येणारा, तिडतिड्या, शिडशिड्या २ जोरानें धडाक्यानें काम करणारा, कामावर तुटून पडणारा, झटझटून कामास लागणारा [झडझडणें]

**झडझडाट**—पु १ जोरानें वाहणाऱ्या वाऱ्याचा आवाज, वेग, सोसाटा 'झडझडाटें सुटला वारा।'—मुआदि २६ ८१ २ घोष गर्जना ३ (ल) अस्तित्वाची मोठ्यानें जाणीव करून देणें 'मार्जी वेदाचा पाला दाट। तो करी मुक्तियेचा झडझडाट।'—ज्ञा १५ १९२ [ध्व झडझड]

**झडझडीत, झडझडून**—क्रिवि १ अर्थाला अधिक जोर आणण्याकरिता झाडणें या क्रियापदापूर्वी योजतात उदा० रोली झडझडीन, थडझडून झाड' २ जलदीनें, त्वरेनें, झडकरी पहा (क्रि० जाणें, चालणें, पळणें, धावणें, उठणें, मारणें, करणें इ०) ३ तिडकारून, झाडून 'मातुनि सुतसुया मनपक्षातें झडझडोनि या। निघ र।'—माउयोग ११ ३५ [ध्व झड द्वि]

**झडझांयट**—न झटजोंबट पहा

**झडणें**—अक्रि १ (टोकाचे केंस शरीराचे अवयव, फळें, पानें इ०) गरगारसें गळणें, गळून पडणें तुटून पडणें 'हे हात पाय झडून जावोत'—नामना ८३ २ झिजणें, क्षीण होणें, रोगानें जाणें 'आठ दिवस ह्यारी वर हाताच बाबाचें दोंद गेलें' ३ (रंग, चित्रें, लेखन इ०) निस्तेज फिके होणें ४ (ल) नाश पावणें भग्न मनुष्याचें करणें 'कागर झडनादिक्षडावें। नलकेचि अम्बर।'—दा १९.१ ११ 'कुणी पदर धरून आड झडुन उभ्या राहती।'—प्रला २३२ ५ तुटणें, छिन्न होणें नाश पावणें 'जरि जिव्हा जाय झडोनी।' (इमारत छप्पर, व्यवस्था, संस्था इ०) मोडणें, टासळणें [स शद् प्रा झर्, म झड] **झडणी, झडणूक**—स्त्री झडण्याची गळण्याची, गळून पडण्याची क्रिया [झडणें]

**झडतपडत**–क्रिवि (प्र) पडतझडत १ साटत्साडत, गळतगळत, टपक्तटपकत, झरतझरत (गवत, पानें, वाळू, रास इ० नेत असताना) २ धडपडत, कष्टाकष्टानें, ठेंचाळत, मोठ्या दु खानें, कसेंतरी. [झडणें+पडणें]

**झडणें**—अक्रि १ (चौघडा, झाज इ० वाद्यें वादविवाद इ० जोरानें) वाजणें 'झडे चौघडा अनेचे पुढें।'—पाळणेसग्रह पृ ६. २ (पतंग इ०) उडणें, धडाडणें ३ (सैन्याचा किंवा नोकरीचा) पगार ठरल्या वेळीं महिन्याचा महिन्यास मिळणें, भराभर, एकसारखा पैसा घेण्याचा क्रम सुरू असणें, अखंड पैसा मिळत असणें

**झडती**—स्त्री झाडा पहा १ (कायदा) (सामानाची, घरातील कागदपत्राची–पोलीस अधिकाऱ्यानें केलेली) बारीक तपासणी, झाडा, धुडाळा. (क्रि० घेणें). (एखादी वस्तु सापडण्याकरिता केलेला) शोध, तपास, धुडाळा. 'सुरी सापडली नाहीं म्हणून सगळ्या घराची झडती घेतली' ३ सैन्यगणना ४ (घरातील जंगम मिळकत, उत्पन्नाच्या बाबी इ० काची) मोजदाद, गणना, गणती, मोजदादीची, हिशेबाची तपशीलवार यादी किंवा तपासणी 'झडती चिरंजीव राजश्री माधवराव नीलकंठ याचें लग्न'—भाग्रे १० ३ १६ ५ (पैसा, हिशेब, अन्नादिक पदार्थांची सामुग्री इ० काचा) फडशा, फन्ना, बेवारा, नि शेषता (क्रि० लावणें, देणें) ६ (सामा) हिशोब, झाडा, उलगडा 'जागों स्वाऽधर्माची दती यवेंचि वीर ते झडती।'—मोकर्ण ३३ ४३ ७ (गो) ताळा ८ खेड्याच्या मुख्य उत्पन्नाचा व खर्चाचा हिशेब, सदर हिशेबाचा कुळकर्ण्याजवळ असणारा तक्ता, मामलेदारानें हुजुरून नेमणूक बेहेडा व अनमास घेऊन त्या अन्वयें जी सरसाल प्रांताची वहिवाट करी त्या वहिवाटीचा मामलेदार तपशीलवार हिशेब तयार करी तो ९ (व) नाटकांतील भूमिकेच्या भाषणाचें लिखाण 'झडती चांगली पाठ कर' १० (प) उठावणी सपादणी भूमिका घेतल्या प्रमाणें वागणें 'सोंग घेतो त्याची घडती दिली पाहिजे' ११ (कु) गणित उकलणी 'झडतीची तर मी एकाक्षीपर्यंत मजल गाठली होती'—कुलविहारी, मार्च १९२७ [झाज]

**झडती**—क्रिवि लौकर, त्वरेनें, झपाट्यानें 'नाना नीद धराया हातीं। घेऊनि उठिला झडती।'—अमृ ७ ७५ [स झटिति, प्रा झडति]

**झडप**—स्त्री १ झेंप, झप, उडी, उड्डाण धाव, पकड (क्रि० घालणें) 'झडप घालून पाय धरी।'—कीर्त १ दाराची, खिड

वीची फळी, ताटावरचे झाकण, आवरण २ (योगशास्त्र) पडदा [प्रा झडप, हिं झडप, गु झडप]

**झडप**—स्त्री झटपट त्वरा [हि प्रा झडप] **झडपसे**-क्रिवि (हिं) १ जोरानें, त्वरित २ सपाट्यानें (किंवा) एक हुकूम जो निघाल्याबरोबर चालणारांना ताबडतोब एकदम अतरनें पायऱ्या ठेवीत पुढें चालण्याचें असतें —सम्या ७४

**झडपड**—स्त्री तडपड पहा आरोची धडपड, धडपड **झडपडधा**-वि धडपडया, तडफडया [झड+पडणें]

**झडपड**—स्त्री झपट पहा [झपट प्रा झडप्पड] **झडपड्या**-वि चपळ, त्वरीत झपाट्यानें काम करणारा

**झडपडा**—पु झडप पहा पकड, पछाडणें, हिसडा (क्रि० घालणें) [झडप]

**झडपण**—न १ झडपण्याचें, वारा घालण्याचें साधन, पंखा २ झाकण, आच्छादन झाकण खिडकीची फळी झडपा [झडप]

**झडपण-पणा**—स्त्री १ भूतबाधा पछाडणें; सपाटणें 'कशी मन करूं या धाडाला झाली झडपणा। येईना पाल गे बाई कोणी करवा मनजना।' 'प्रीतिची बाधा झाहली तुला झडपणा।' —राला ३ २ एकाएकीं हल्ला करणें पछाडणें [झडपणें]

**झडपणा**—स्त्री १ वारा घालण्याची, झडपण्याची क्रिया २ वारा घा ण्याचें साधन, पंखा झडपणें पहा ३ देव भूत यांची इ०ची बाधा झडपणा पहा. 'यक्षी सागनि या जाणि झडपणी।' —निगा ७७ ४ निरसन —शर ५ झडप झपट झाप 'सागिंगरुडाची काय झडपणी चिमणी।' —मोमीमत १४७ [झडपणें]

**झडपणें**—न वारा घालण्याचें साधन, वारा घालण्याचें साधन, पंखा, सूप

**झडपणें**—सक्रि १ धान्य स्वच्छ करण्यासाठी वारा घालणें वारवणें २ (भूत, पिशाच, देवता इ० यांनीं) पछाडणें, झपाटणें 'भूतें झडपोन मारिती।' —दा १ १० ५९ ३ झोडपणें, मारणें झोडपणें पहा 'झडपीनी चारवाचे मोहाळें।' —उषा १७०३ ४ पाडणें, धरणें 'गरुड जसा गगनांतुनि वरी उतरोनि पन्नगा झडपी।' —मोकर्ण ४५ ११ —अक्रि १ वाजणें (पाऊस) २ (श्वान) झडप घालणें, पक्षी इ०नी) उडी घालणें 'तो वरीचा पिंड झडपानी। घारीनें नेला अकस्मात।' —गावि ३ १८७ ३ धडपड करणें हातपाय झाडणें 'चाप उरीं दडप धडप मग आननपंकि धर रचली।' —वामनगीता ११ ४ झडणें धास्ती घेणें, दडपून जाणें 'यागुज्भेणें काय झडप। वीं वारचमीं रवि हारप।' —ज्ञा ७८ १४ [प्रा दे झडप्प]

**झडपपखा**-पु नोकरानीं वारा घालण्याचा मोठा पंखा पंखा मराठ्यांच्या गोल्याशी लावणें, झडपपखा हजर ठेवणें —ऐरापु विवि ४८ [झडपणें+पंखा]

**झडपा**—पु १ (पर्ण इ०कांनीं) झांकण २ कामट्या, वासांच्या पाटया इ०कांनी बनविलेलें (दर्याच्या इ०कांनी) दार झांपा, झापा, ताटी, फाटक ३ बांबूच्या कामट्यांचा पंखा [झडपणें]

**झडपाझडपी**—स्त्री १ वारा घालणें, वारवणें २ (ल) झोंबाझोंबी, धकाबुकी [झडपणें]

**झडपी, झडपें**—स्त्रीन ताटी, फाटक झडपा पहा

**झडपीव**—वि वारा घातलेलें, वारवलेलें [झडपणें]

**झडा**—स्त्री त्वरा, घाई जल्दी झड पहा

**झडाका**—पु (काठी, पदर, पाऊस, वारा यांचा) जलद सडाका, रपा, प्रहार (क्रि० लागणें) या शब्दाचा झपाटा व धडाका या शब्दांच्या अर्थीहि क्वचित उपयोग होतो.

**झडाझड-झडां-झडीं, झडाड-डा**—क्रिवि लौकर लौकर, झटपट, जल्दीनें 'अश्रुंचाच महापुर वाहती शिरें उडारीं झडाझडीं।' —ऐपो ११४ [झड द्वि]

**झडाड**—पु १ (वारा, पाऊस इ०कांचा) जोर, सोसाटा, सपाटा, धडाका 'प्रळयवायूचेनि झडाडें। आकाश निजस्वभावें तुटे।' —एभा ११ ४१२. २ (पंखाचा) फडफडाट, जोराची फडफड 'ज्याच्या पंखाचा झडाड। उन्मळी मुळें भराडा।' —एभा २१ २

**झडाडणें**—अक्रि १ तडातडानें, त्वरेनें लागणें २ जोरानें, उत्सुकतेनें लागणें ३ उत्साहानें पुढें चालणें, सुरू ठेवणें ४ (वारा) सों सों करीत वाहणें झडझड आवाज करीत वाहणें 'झडाडी तो वारा झडकत नभामाजि विपुल।' —दावि २२७ [झडझडणें]

**झडात**—क्रिवि झडाडत, झडझड आवाज करीत 'वातवात झडात झडाडिलो।' —दावि ८६ [झडाडणें]

**झडातावा**—स्त्रीभर झरातावा पहा

**झडिती**—क्रिवि लौकर, झटकन्, जल्दीनें [स झगिति]

**झडिवारा**—पु जोराचा, सोसाट्याचा, वादळाचा वारा 'तव तेथें थोर पाऊस पडला। झडिवारा तेणेंहि वळा। रुखासालि वैगरा।' —पच ३ १५ [झड+वारा]

**झडी**—स्त्री १ पावसाची एकसारखी वृष्टि, झड २ क्षयरोग झुरणी, रेंगाळत राहणारा क्षीण करणारा रोग 'झडी पडली मी क्षणक्षण जमरा कष्टा भोग देसी।' —हाग १७५ ३ (झाडें इ० कांच्या पानांची) गळती, जीर्ण होऊन गळून पडणें 'प्रभाति होय पानझडी।' —एभा ३ १५५ ४ उडी झडप 'तुका म्हणे आता झडी घालूं पाहें। पांडुरंगे माये तुझे पायीं।' —तुगा १६११ ५ पावसापासून रक्षण करणारें दार खिडक्या इ०कांवरील झडपण, ताटी इ० [पडणें]

**झडी**—स्त्री १ घाई त्वरा २ उत्साह उमेद 'ओढीना न झडी धरूनि तुम्ही कोणी न तोंडी वरा।' —आसी ५० [स झगिति प्रा झडि]

**झट्टी**—स्त्री (कर) (मुलींच्या भाषेंत) वट्टी एका हातातून दुसऱ्या हातात झेलणें. 'झट्टीकर'

**झडथा**—वि (रोगानें) क्षीण होत जाणारा, खगणारा, क्षयी (शिवीसारखा याचा उपयोग करतात) 'मेरया झडथा' —शेक्स्पियर नाट्यमाला—रोमिओ ज्यूलियट ८७ [झड]
°**पडथा**—स्त्रीभव झोकाडथा, झुकाडथा, पायाचा थरकाप (क्रि० देणें, खाणें, जाणें) [झडणें+पडणें]

**झण-कन-कर-दिनीं-दिशीं**—क्रिवि १ झणझण, सणसण, सु सु करीत (बंदुकीची गोळी, गोफणीचा दगड इ० जाणें) २ झट्कन झटदिशीं, झटक्यासरशीं, खट्कन [ध्व झण्]

**झणकवायु**—पु घोड्याच्या पायाला होणारा एक रोग यानें घोडा चालत असताना त्याच्या पायात शिणका भारते (इ) स्प्रिंगहाल्ट —अश्वप २१११ [झणक+वायु=वात]

**झणका**—पु १ झणकारा (विंचु इ०काच्या दशानें होणारा) सणका, सणसण, चुणचूण, तीव्र वेदना (क्रि० लागणें, सुटणें, वाटणें) २ (राग, मताप इ० मनोविकाराचा) झटका, झणकारा (क्रि० येणें) 'प्रेमाच्या झणक्यात हसावाई म्हणाली.' —स्वप ४८ ३ झणझण असा आवाज, छनछनाट, झणत्कार. 'नाण्याच्या झणक्यानें नाचणारी भुतं दारिद्र्याच्या मनाला दूर होतात' —संतेचे गुलाम ९२ [ध्व. झण्]

**झणकार-कारा**—पु १ टणत्कार, झणत्कार, झणझण असा आवाज, सणाटा, सणसणाट २ झटका, फटकारा, झटकारा 'झणकाऱ्याबरोबर दिवा गेला' ३ (बोलण्याची, काम करण्याची) चपलाई, हुषारी, झपाटा, वेग ४ (मनोविकाराचा) उद्रेक, फणकारा, लहर (क्रि० येणें) ५ (विंचु इ० कीटकाच्या दशानें होणारा) सणकारा, शिणका, चुणचूण, झणका (क्रि० मारणें) [ध्व झण्]

**झणका**—स्त्री १ (आघातानें, तडाख्यानें कानात, हातास इ० होणारी) झणझणी, भणभण २ चुणचूण, दाह तीव्र वेदना (नागी मारल्यामुळें) ३ (अतिशय तिखट पदार्थ खाल्यानें होणारी जिभेची, तोंडाची) आग, दाह, झणझण (क्रि० मारणें, वहणें, निघणें) वरील अर्थी **झणक्या** (अव) हें रूप जास्त प्रचारात आहे. [ध्व झण्]

*झणझण*—स्त्री (गो) १ वारा झोंबणें २ झणझणी पहा

**झणझण-झणां**—क्रिवि १ झणझण असा आवाज होऊन २ जलद, लौकर ३ फणकाऱ्यानें [ध्व]

**झणझणणें**—अक्रि १ झणझण आवाज करणें खणखणणें टणटणणें घणघणणें (टाळ वगैरेनीं) २ (मोठा आवाज आघात इ०कानीं होणें, हात, कान इ० अवयव) झणक्यानें युक्त होणें, भणभणणें, शिरशिरणें, धमकणें, टणकणें 'चापगुण झणत्कारें झणो. ३ ५४ दिग्वारण मस्तकेंहि झणझणती।' —मोकर्ण ४८ ५१ ३ (तिखट इ० पदार्थांनीं तोंडाला, जिभेला) झोंबणें, आग होणें, भडका होणें ४ (विंचु इ० काच्या दशानें) सणका मारणें, चुणचुणणें, फुणफुणणें [झणझण]

**झणझणाट**—पु १ (वाद्याचा) झणझण असा मोठा आवाज खणखणाट, घणघणाट, टणटणाट २ (आघातानें शरीरावयवाला होणारा) भणभणाट, तीव्र वेदना ३ (तिखट पदार्थ तोंडाला झोंबल्यानें होणारा) भडका, आग ४ (विंचु इ० च्या दशानें होणारी) तीव्र चुणचुण, शिणका [झणझण]

**झणझणी, झणझण**—स्त्री १ (अगावर बुक्की मारल्यानें कानात होणारा) फणफणाट, वेदना २ (उष्ण पदार्थ खाल्ल्यानें होणारी) तोंडाची आग ३ (नागीच्या दशाची) रणरण (क्रि० येणें, सुटणें, लागणें, उठणें)

**झणझणीत**—वि फार तिखट, तोंडाला झोंबणारा, अतिशय मसालेदार, चरचरीत (पदार्थ, जेवण इ०) [झणझण]

**झणत्कार**—पु (नूपुरें, घागऱ्या, वाळे इ० काचा) झणझणाट, झणझण किंवा छुमछुम असा आवाज 'चरणीं वाजऱ्या नेपुरें। चालता गरजती झणत्कारें।' [सं]

**झणत्कारणें**—अक्रि (काव्य) झणत्कार करणें 'पदीं नेपुरें झणत्कारिती।' [झणत्कार]

**झणफण होणें**—अक्रि (कर) उडणें

**झणाझण-झणां**—क्रिवि एकसारखा झणझण, खणखण असा आवाज होऊन [ध्व नण द्वि]

**झणाटा**—पु १ (दगड इ० काचा किंवा इ० कावर होणारा) मोठा व आवाजयुक्त टोका, टोला, तडाखा (क्रि० बसणें, मारणें) २ (बाण, वेंडू, बंदुकीची गोळी इ० काचा) गोंगावत, सु सु करीत लागलेला तडाखा (क्रि० लागणें, बसणें) ३ विंचवाच्या दशाचा झणकारा (क्रि० मारणें, बसणें, होणें, वाटणें) ४ (उन्हाची) झळ, निरोप (क्रि० लागणें, बसणें) ५ (मनोविकाराचा) उद्रेक, उमाळा (क्रि० येणें) ६ (सढळपणें) अवाढव्य पणा मोठेपणा, विस्तीर्णता अवाढव्यपणा, अतिरेक, आधिक्य (आकार, संख्या, परिमाण, गुण इ० काचा, उदा० सापाचा-म्हशीचा-मुलुखाचा-शेताचा-पिकाचा-पावसाचा-उन्हाचा-*वाऱ्याचा-थंडीचा-झणाटा*), *समासातहि उपयोग होतो, तसेंच* विशेषण व क्रियाविशेषणासारखाहि उपयोग होतो उदा० झणाटा साप, झणाटी म्हैस; झणाटा पाऊस इ० [ध्व झण्]

**झणाण**—पु अतिशय मोठा, झणझण, घणघण असा आवाज २ (बाण इ०काचा) झणझण असा आवाज 'बाण झणाण गणाणित भाली होताहे भडिमार।' —दावि ३३४. ३ (आघातानें, तडाख्यानें होणारी हाताची, कानाची) झणझण, शिणका [ध्व

क्षण] झणाणणें—अक्रि १ (धाट इ० वाद्याचा) मोठयानें झणझण असा आवाज होणें 'वस्य श्री अश्वसाहणी । मागें तरटाचा कर झणाणी।' –एभा २०.२१६ २ (फोडणी, इ० कांचा) झण्झण, चुरचुर आवाज होणें, झणझणणें. [झणझणणें]

झणाणां—क्रिवि एकमारख्या झणझण असा मोठया आवाजानें, घणघणां, खणाणा ठणाणा 'घटका गेली पळें गेलीं तास वाजे झणाणा।' [ध्व.]

झणि-णीं, झणें—उभ (काव्य) १ कदाचित्, न जाणों, नाहीं तर 'तें देखोनि आदिपुरुष विस्मितु। म्हणे झणें होय पा अनु।' –ज्ञा १.१५९ 'म्हणेल अतुल कथा झणि म्हणाल तो आग्रही।' –केका १११ –क्रिवि लौकर, त्वरित, जल्दीनें 'कीं जीव दहावें धरणें। मज पाता सुटे झणें।' –ह १८ 'तया वैदर्भी देशि झणीं पावें।' –र १८ [स क्षणे, म. क्षणि-झणि, सं शब्दे–सणे–क्षणे–झणीं=शीघ्र –भाअ १८३४]

झणें—अ (काव्य) क्रियापदाला जोडून निषेधार्थी उपयोग करतात 'म्हणोनि अर्जुना अर्जुना। झणें चित्त देसी या हीना।' –ज्ञा २.१७ –क्रिवि निश्चितरूपें, खरोखर, निःसंशय, खात्रीनें 'केला कर्मी जें देयावें। तें झणें मज होआवें।' –माज्ञा १८ १११.

झननन—उभा (मजुळ वाद्यें, घुंगरू, पैंजण यांचा) झणझण असा आवाज 'झननन झानन झनत्कारी।' –राला ३१ [ध्व झन्]

झनाटया—वि. फार मोठा, दांडगा (वाघ, विंचू, साप इ०) झणाटा अर्थ ६ पहा 'तो मंत्र पण झनाटया वाघ होता' –सूर्योदय ४ [झपाटा]

झनानणें—अक्रि (व) झणझणणें, झणाणणें झनावणें—सक्रि (व) झणझण होण्याइतकें जोरानें मारणें भडकावणें [ध्व झण्]

झनाना—पु जनानखाना, जनाना पहा [फा झन्=स्त्री, बायको]

झप-कन-कर-दिनीं-दिशीं—क्रिवि झटकन, चटकन, लौकर, त्वरनें, झपझप पहा

झपका—पु १ झुपका, झुमका पहा –वि झुपकेदार, 'झाड झपक फूल टपक।' –मसाप ४ ४ १५२

झप(पा)झप-झपां—क्रिवि झटकन झपकन पहा 'तो झपझप चालतो' 'सर्व गोष्टी त्याला झपाझप समजत असत.' –गोरकि ७२८ [झपाटा]

झपणें—क्रि (व) दचणें

झंपा—पु १ एक प्रकारची झाज २ (संगीत) एक तालाचें नांव हा कर्नाटक संगीत पद्धतीतील आहे त्याचे ६, ७, ८, १० व १२ असे पांच मात्राप्रकार आहेत [स]

झपाटणें—सक्रि १ (एखादी गोष्ट, काम) त्वरेनें तडका फडकी करून टाकणें, उरकणें, जल्द संपादणें २ गट्ट करणें, वकावका खाणें, खाऊन फस्त करणें ३ (भूत, पिशाच इ०कांनीं) पछाडणें [ध्व झप्+सं पाटन=मोडणें, तोडणें, हिं झपटना] झपाटा—पु १ सपाटा, जोर, वेग, तडाखा आवेश, घाई (यांत कौशल्याचा अंतर्भाव होतो) उदा० चालण्याचा–लिहिण्याचा–खाण्याचा–झपाटा २ (शस्त्र, पदर, इ०कांनीं लागणारा) जोराचा तडाखा, घाव, फटका ३ जोर, आवेग, तीव्रता, उदा० तापाचा–वाऱ्याचा–उन्हाचा–जरीमरीचा–साथीचा–झपाटा ४ पछाडणूक, झडपणी, उदा० भुताचा–पिशाच्चांचा झपाटा ५(पशु, पक्षी इ०कांनीं भक्ष्यावर घातलेली) झडप, झपेट ६ अतिशयितता, आधिक्य उदा० हाताचा–बोलण्याचा–चालण्याचा–खाण्याचा–झपाटा ७ फटकारा, झटक उदा० पदराचा झपाटा ८ निरखोळ लढाई, चकमक [ध्व झप म झपाटणें] (वाप्र) (एका)झपाटयानें–क्रिवि एका झटक्यांत, दमात, तडाक्यांत (पदराच्या) झपाटयांत सांपडणें–कचाटींत, तावडींत सापडणें झपाटयासरसा–क्रिवि झटक्या-सरशीं, झटक्यांत झपाटया–वि चपलाईनें काम करणारा कामाचा उरक असलेला, झपाटा पहा. [झपाटा] झपाटयाचा वारा–पु तासीं तीस किंवा त्याहून अधिक वेगाचा वारा –मराठी ६ वें पुस्तक, पृ २०१

झपाडणें—सक्रि (ना) निजविणें, झोपविणें [झाप]

झपाडी—वि (गो) अतिशय झोंपी

झपाण—न डोंगराळ, अडचणीच्या प्रदेशांतील प्रवासाचें साधन वाहन हें पाळण्यासारखें असून यास चार माणसें उचलतात, डोली 'रघुनाथराव यांनीं त्या देशाचे रिवाजा प्रमाणें स्वतः बसण्याकरिता एक झपाण केलें' –तीप्र ३३ [प्रा झपण, हिं झप्पन]

झपापा—क्रिवि. झपझप पहा [झप द्वि]

झपु(पू)र्झा—उभा (काव्य) जा, पोरी, जा, हें वाक्य भराभर टयानें उच्चारलें असतांना होणारा ध्वनि, शब्द हा शब्द केशवसुत कवीनें प्रत्यानंदाच्या सीमेचा वाचक याअर्थी रूढ केला 'झपूर्झा! गडे झपूर्झा!' –केक १०९

झपेट—स्त्री १ (हिंस्र पश्याची) झडप झाप, उडी २ पिशाच्चबाधा [झपाटा हिं]

झबका—न झुबका, झुमका

झबलें—न लहान मुलाचें एक विशेष प्रकारचें अंगडें, हें अर्ध्या मांड्यापर्यंत लांब असून हे सरकफामाचें, गळपट्टीचें व गुंड्याचें असे तीन प्रकारचें असतें अंगलें पहा. [अर जुब्बा, फा जुबा जबा हिं झगुला]

झ(झु)बा—पु अंगा मोठा, पायघोळ सदरा (मेहुरदार सारखा) [अर जुब्बा=झगा, फा जुबा गु झभ्भो]

झंवाद्—वि (गो) १ जहाबाज २ निष्णात

झन्मू—पु १ घमेंडखोर मनुष्य. २ शिष्ट समजला जाणारा, एकप्रतिष्ठित माणूस ३ (परयाचा खेळ) एक खेळ त्या खेळातील मारणी [ सं ध्रुव=ठेव्या ]

झॅम—स्त्री (गो) झोंप, डुलकी

झमकणें—अक्रि १ चमकणें झळकणें, चकाकणें, प्रकाशणें 'कुंडलें तळपती नीळ। वरी जडिले झमकती।' —दा १२ १४ २ (ल) शोभणें 'बारा हजार घोडा पुण्यांत कडकडीत। त्याशिवाय चमकती पागा नाहीं गणित।' —ऐपो १३० ३ झण झण असा आवाज करणें झणत्कार करणें 'विणें टाळेंघोळें झम कत गुणी दीपदहनीं।' —दावि २२२ ४ (व.) लढाई, भांडण जुपणें, चकमक उडणें [चम् प्रमाणें झम्। ध्व दृग्य, हिं झमक= चमक]

झमझम-झमां—क्रिवि १ (घुंगराचा, घागऱ्याचा) रुण झुण, छुमछुम, झणझण असा आवाज होऊन २ जोराचा पाऊस पडत असतांना होणाऱ्या झमझम अशा आवाजाप्रमाणें ध्वनि होऊन. झिमझिम पहा [ ध्व झम द्वि ] झमझमा—पु (संगीत) खटका अर्थ ३ पहा [ झमझम ] झमझमाट—पु १ नुपुर, चाळ, घुंगरू इ० काचा झमझम असा मोठा आवाज २ (ल) नृत्य, नर्तन, नाच [ झमझम अर झम्‌झम=गाणें नाच ] झमाझमी—स्त्री १ तरवारींची चकमक कचाकच, चकाचकी २ (ल) भांडण, कटकट, वाचावाच खटका, चकमक [ झमझम ]

झमेला—पु बखेडा, धुडगूस, धुमाकूळ 'हुकमाप्रमाणें निवर्गानीं गडबड करून दिवसभर झमेला माडला' —विविध ३ ९६.

झर—स्त्री १ (गो) झरा २ (पदार्थाचा) झरून, झिजून गेलेला अंश 'हा गाळ म्हणजेच पाण्यानें वाहून आणलेली झर होय' —सृष्टि ४० [ स क्षृ—क्षर=झिजणें, स झर-रा ]

झरक—क्रिवि झरकन पहा 'शरीर थरक झरझरी रोम थर थरी अनचित्त तनें।' —दावि ४१७ [ झरकणें ]

झरकावणें, झरकटावणें—अक्रि (गो) ओरखडणें, झर करणें

झरकणें झर्कणें—अक्रि १ झरकन निघून जाणें पोबारा, गळ्ली, पलायन, करणें सटकणें, निसटणें हातावर तुरी देणें 'नेठे आडत उठली। बाण हवाया झर्कती। गगनामध्यें।' —दावि ५०४ २ पसरणें गरजणें तों नरकती प्रेमाबु लोचनीं।' —दावि ३७५ [ ध्व झर् स क्षृ क्षर् ]

झर-कन-कर-दिशीं-दिनीं—क्रिवि झरकन, चटदिशीं, झटक्यासरशी

झरका—पु (हालचाल, क्रिया, भाषण इ० व. रीत) त्वरा, चपलाई, चापल्य चलाखपणा (क्रि० करणें, मारणें, लावणें) [झरकणें] ०देणें सक्रि गिरका देणें पसविणें, हातावर तुरी देणें 'नाहीं तर दे झरका भाषा गळा।' —सला ०

झरकुंड—न जंगल

झरझर-रा, झराझर-रां, झरारां—क्रिवि झपझप पहा. 'निर्झर झरझर उडया मारिती मृग विपिनीं उडती बागडती।' —विक ३१ [ ध्व द्वि ]

झरथरणें—अक्रि स्फुरणें, फुरफुरणें, अंगावर शहारा येणें, थरथरणें 'शरीर झरक झरझरी रोम थरथरी अनचित्त वरतें।' —दावि ४१७ [ झर द्वि ]

झरझरी—स्त्री गुडगुडी हुक्का व त्याची नळी असता व्यस्त लोक गाशा टाकून झरझऱ्या लावून बसले' —भाव ९९ [ ध्व झर् हिं चखझर ]

झरझरीत—वि विरविरीत, झिरझिरीत, विरळ विणीचें, अतिशय पातळ (वस्त्र) [ स जर्जरित ]

झरणें—अक्रि १ पाझरणें, बारीक धारेनें वाहणें, झिरपणें, २ पाघळणें, चिघळणें ३ गळणें, टपकणें, पाझरणें उदा० ताल ४ (शरीर, आयुष्य, संपत्ति, वुद्धि इ०) कमी होत जाणें, झडणें, झिजणें, क्षीण होणें 'पुष्कळ गध उगाळ नको, खोड झरेल' [ स क्षृ=झरणें, क्षृ=झिजणें, प्रा झरण, हिं झरना, गु झरवु ]

झरनाटबंद—वि (व) मोठा, अवजड, अवाढव्य [ झणाटा= अवजडपणा+बंद ]

झरनाटा—पु (व) झपाटा, झगाटा [ झणाटा ]

झरनाटून—क्रिवि (व) सपाटून 'झरनाटून छन लागले'

झरम—न एक प्रकारचा मासा

झरवण—न झरा, झिरपण [ झरा+वण प्रत्यय ]

झरवणी—न १ झऱ्याचें पाणी २ निरपणारें, पाझरणारें, ठिपकणारें पाणी [ झरा+स वन=पाणी ]

झरम्—स्त्री एक वनस्पती ही मृदु व गोड असा दोन प्रकारची असून हिच्या पानांची भाजी करतात

झरा—पु १ जमीनींतून, खडकांतून निघणारें पाणी, त्याचा प्रवाह निर्झर वरळे वाहणें भावार्थ। उदकाचा तरंग जर।' —दा ११ ७ ३ २ (ल) पैशाचें सपत्तीचें उगमस्थान मूळ, निगम, खाण ३ (द्रव्य इ० ची) सतत होणारी प्राप्ति [ स क्षर-झरा ]

झरा—पु झारा पहा

झराका—पु चपळता, चलाखपणा झरका पहा

झराझर-रा, झरारा—क्रिवि झरझर पहा. 'मिळ्नचीं कार्यें भरभर बाहेर पडलीं नाहीं' —विवि ८ १ १६

**झराट**—वि सतत, एकसारखें, झरझर 'तेणें सोडलें गार जीवन। नखांतून झराट तें।' –नव १४ २३ [स झरणें]

**झरातारा**—स्त्री भव (ग्रां) जोराचा, नेटाचा प्रय त्न, आटो-काट यत्न (क्रि० देणें)

**झरार-रा**—क्रिवि झरझर पहा 'तुम हा झगर आला पुढें।' –रामदासी २ १५ 'अतीं जाशिल र झरारा।'–मोहि-रायाहृत स्फुट पदें (नवनीत पृ ४११)

**झरी**—स्त्री १ झरा आहळ आडा 'नाना झऱ्या भिर-पती।' –दा १६ ४ १ २ (को कोकणी) भार म्हणून जी भात जमीन तयार करतात तिच्या बांध घालून आतील पाणी सोडण्यास बांधास जो फाज (दरवाजा) राखतात तेथपासून भारजमि नीच्या उच भागापर्यंत बांधलेला फरसबंदी नाला –कृषि २१४ [स झृ]

**झरी**—स्त्री ह्रास, क्षय, (संपत्ति, शरीर, आयुष्य इ० चा), कमी कमी होत जाणें क्षय पावणें (क्रि० लागणें) [स झृ=झरणें]

**झरी**—स्त्री झारी पहा

**झरीपट्टी**—स्त्री (गवंडी काम) सिडक्या व जाळ्या याच्या पायथ्याची गिलाव्याची उतरती भिंत [झरणें+पट्टी]

**झरु(रू)का, झरोका-खा**–पु (भिंतींतील) लहान खिडकी, गवाक्ष, जाळी 'तिहीं पहाते झरका उघडुन शब्द तया पडतीं करणीं। –प्रभा १५० 'सुरधुर्जी रोधिति ज्या झरोखे।'–मारुह ७ ६७ [ध्व झरझर]

**झर**—पु अन्न मागाची एक पोटजात यांची वस्ती ठाणें जिल्ह्यांत आढळते –अस्पृ ४३

**झर्नाट्या**—वि (व कुण) भगभगीत, अवाढव्य भन्नाट्या पहा 'अगा मानांट्या माणूस मी पाहिला नाहीं'

**झल**—स्त्री (व) झळ पहा [हिं]

**झलक-की**—स्त्री (व) तरतरी हुशारी चलाखपणा [हिं]

**झला(ल्ला)ळ**—स्त्री (काव्य) १ झळाळ चमक, तेज, चकाकी, लखाखी मुगुट माथा कोटी सूर्याचा झळाळ।' –तुगा ३ २ ज्वाळांचा डोंब भडका, जाळ [स ज्वल् हिं झल]

**झल्लर**—स्त्री (काव्य) झालर किनार मुक्ताफळांची झल्लरें। झुबकें रत्नमणींचे।' –वसीस्व ७ ८० [स झल्लरी]

**झल्लर**—पु पाण्याचे तुषार, आलक्ता नीरन भार समीर घुमारें। झल्लर मारितसे वर वारें।' दावि ४४६ [म झिरी]

**झल्लरी**—स्त्री झांज 'मगर डाळ नाद उमित झल्लरी। मृदंगध्वनी त्यामाझारीं। –एहस्व ६ ७४ [स ध्व]

**झ(झ)वणें**—उक्रि (अश्लील) संभोगणें मैथुन करणें स्त्रीशीं रत होणें [स अवन-झवणें-झवणें; स धव=नवरा, त्याचें मुख्य कर्म धवन अथवा (-वि) धुवन (=रत) याचा अपभ्रंश झवणें –राजवाडे भाअ १८३३ तुल० स च्यु-झव=जाणें हलणें]

**झवकीर**–वि (अश्लील) कामुक विषयांध श्लील नाहीं तरी आस्नांतहि आहे [झवणें] **झवतरोड**–वि (अश्लील) रोडका, निस्तेज बांध्याचा, अशक्त, दुबळा मनुष्य, हें एक अप शब्दहि आहे [झवणें+रोड] **झवर-घाडपट्टी**–स्त्री (अशिष्ट) एखाद्याची भरमसाट शिव्या देऊन केलेली निर्भर्त्सना स्त्री संबंधी घाणेरड्या शिव्या देणें (क्रि० काढणें) [झवणें] **झवाडणें**–सक्रि (अशिष्ट) शिव्या देऊन खरडपट्टी काढणें, निर्भर्त्सना करणें, अभद्र बोलणें [झवणें] **झवाड्या**–वि (अश्लील) व्यभिचारी, अति शय कामुक, विषयासक्त [झवणें]

**झष**—पु मासा [स]

**झळ झळई**—स्त्री १ उन्हाची तिरीप, धाप, धग, अंग भाजणारी उष्ण वाऱ्याची झुळूक (क्रि० लागणें, लागणें, दाधणें धगणें) 'तृषार्ता मरुदेशीं। झळे अमृतें बोळवी जैसी।' –ज्ञा १८ १६१ 'कवळ बाळ झळनें ग्रीष्मास जसा त्याचि कोमेला। –मोभाव ५ ३२ २ अग्नीची धग, अढी, आंच ३ मृगजळ 'उदकाचिया दावुनि आणी। उर फोडी झळई।' –तुगा १८६३ –वि तेजस्वी, झगझगीत 'झळकत झक झळ घनदामिनी,' –दावि ४९६ [स झला; धातु ज्वल् दिव्यू गल्] **झळणें**–अक्रि सूर्यकिरणांनीं तापणें (भग इ०) **झळघट**–वि उन्हानें तापलेलें, तापविलेलें (पाणी इ०) ०**पाणी**–न उन्हानें गरम झालेलें, केलेलें पाणी (घामोळें इ० रोगास उपयोगी) [झळ+पाणी]

**झळ**—स्त्री १ धातु तापविल्यानें होणारी घट धातु तापवि ताना निघून गेलेलें अशुद्ध द्रव्य २ (ल) व्यापारातील घट, तूट, बूड, टोकर (क्रि० लागणें) [स झला] **झळणें**–अक्रि उन्हात तापणें, उन्हानें गरम होणें (पाणी)

**झळक**—स्त्री १ उन्हाची झळ –शर २ चमक चकाकी (क्रि० मारणें) 'तेंचे झळक दत किरीट तो साजे।' –गीताचंद्रिका १ ७ [स झल] **झळकणें**–अक्रि १ चकाकणें, प्रकाशणें चमकणें, झांक मारणें २ शोभणें साजणें 'करीं झळके माळ मुक्ताफळांची।' –आरती गणपतीची 'कानीं झळकते कुंडलें।'–उषा १० ८९ ३ दृष्टीस पडणें, आढळणें, दिसणें 'झळपडा झळकती सकळ। प्राणी तेथें।' –दा १४ ४ ९ [स झग म झळक, सिं झलकणु का जऴकने=चकाकत स्पष्टपणें] ०**झळक**–स्त्री चकचकीतपणा, चकाकी, तजस्विता नखाशी –वि चकचकीत स्वच्छ झळकणारा [झळकणें द्वि] **झळकावणें**–सक्रि १ चकचकीत करणें स्व च्छ लखलखीत करणें २ (ल) (शस्त्र इ०) परजणें लखलखीत करणें 'कोल्हाटी शस्त्र दावी झळकावून। परी रणपंडित नव्हे तो।' –ह ५ १९३ [झळकणें प्रयोजक]

**झळकं**—न. (गा) मासळी [झळकणें]

**झळकणें**—अकि (ना) (पातळ पदार्थ इ०) हेलकावणें, डचकणें, डचकून सांडणें, झुलकणें पहा [झुलणें]

**झळझळ-झळा**—स्त्री १ चकचकाट, लखलखाट, झिलई, तजेला, उजळा, तजेला २ कडसा —वाक्यवृत्ति ६४६ ३ (गो) स्वच्छता, सफाई —क्रिवि चकचक करीत, झगमगीतपणें 'अतिदृट पदतळ झळझळ तळपति।' —आविश्वा, चूर्णिका १ [स झला द्वि] **झळझळणें**—अकि (भांडीं, दागिने इ०) चकाकणें, चकचकीत दिसणें, चमकणें 'ओंकारातुन माया झाली हिन्याहून झळझळे।' —पला ८ [झळझळ] **झळझळाट**—पु (झळझळचा अतिशय) अतिशय तेज, चकाकी, झगझगाट [झळझळ] **झळझळांवचें**-सकि (गो) स्वच्छ करणें, खळवळणें [झळझळणें] **झळझळीत**—वि १ चकचकीत, झगमगीत २ स्वच्छ, स्पष्ट ३ निर्मळ, शुद्ध झुळझुळीत पहा ४ (ल) थाटमाटाचा 'तुमच्या तेवढ्या झळझळीत देवपुजा पहाव्यात' —नामना ७५ —क्रिवि १ अगदीं उघडउघड, स्पष्टपणें, टळटळीतपणें, धडधडीत ह्या शब्दाचा सदर अर्थी सामान्यत निंदाव्यंजक शब्दांबरोबर उपयोग करतात उदा० झळझळीत—वेड—सादेगिरी—शिनळकी, झळझळीत—वेडा—सोदा—शिनळ 'तो झळझळीत वेडा आणि त्याला मुलगी दता?' २ (निषधार्थी) बिल्कूल, अगदीं, मुळींच 'आज घरात झळझळीत तादूळ नाहींत' [झळझळणें]

**झळणें**—अकि झाकलें जाणें, डाग पडणें झाळणें पहा

**झळपेंवचें**—अकि (गो) झोपेंत वरळणें

**झळफळ**—स्त्री झकपक, झगमगाट, चकाकी (ल) थाटमाट 'धाव वेली नळफळ। दहबुद्धीचा निगाळ।' —रामदास, स्फुट अभग (नवनीत पृ १४७) [झळ द्वि] **झळफळणें**-१ झळकणें झळझळणें पहा 'मानीं कौस्तुभमणी झळफळी वो।' —दावि १०४ २ जळफळणें पहा [झळफळ] **झळफळाट**—पु १ झगझगाट पहा २ दाह, तडफडाट [झळफळ]

**झळफळीत**—वि १ झळझळीत पहा तेजस्वी 'रत्न धार्मी गार्ची तोंगलें झळफळितें श्रीनभावरि यति।' —क्र १३७ २ स्वच्छ निर्मळ 'झळफळित दर्पणें। माळा गळानें आसनें।' —दा २७८२ ३ भरभराट पावणारा, भरभराटीचा, समृद्ध संपन्न [झळफळणें]

**झळंब**—पु झोंपाळ, झळ, वळई जळप जळप पहा

**झळंबर**—पु चादरा 'दीं झळबाचनि मींपें। अनुरागें रगला असे।' —क्र ६८

**झळपणें, झळमणें**—अकि १ (जाताना एखाद्या पदार्थाशीं) घासणें, चाटून जाणें, घसवटणें, खरडणें २ भूत पिशाच्च यांनीं पछाडणें, झपाटणें ३ (काव्य) (दुःख, गर्व माया, मोह इ०कानीं) पछाडणें, व्याप्त होणें; झोंबणें 'सर्वेचि प्राणी झळपला। माया जाळें।' —दा ३४४९ ४ ताप देणें, जाळणें, पोळणें 'प्राक्तनु चडासाचा दमी। थोर तातली कर्मभूमि। झाउवी पडुउमीं। झळपिला जो।' —क्र ९ ५ उन्हात तापविणें, ऊन देणें ६ स्पर्श करणें, स्पर्शणें, (ल) लेपणें 'कापूरकुसुमाचें पाणी। मर्दिजे चद्रकिरणी। तेणें ते विरहिणी। झळंबीजे।' —शिशु ७८५ [झळ] —अकि १ भरून येणें, उचंबळणें, डबडबणें, बुडणें 'तैसे डोळे दीसति झळंबेले। अश्रुपातीं।' —क्र १६ २ हेलकावे, गटंगळ्या खाणें 'जन्ममृत्यूचिया लाटीं। झळंबती इया सृष्टी।' —ज्ञा १२ ८७ ३ विरघळणें 'जैसें लवण जळें झळंबलें।' —ज्ञा २ ३४ आदळणें, धक्के दिले जाणें, हादरणें, डगमगणें, मर्मी लागणें 'पै पुनरावृत्तीचेनि उभडें। झळंबती सत्यलोकींचे हुडे।' —ज्ञा ७ ८४ ५ ओळंबणें, लोंबणें, लटकत राहणें 'त्या नदीच्या तीरावरून एक मोठें झाड झळंबलें आहे' —सिंव ४५ ६ (गुच्छाच्या रूपानें फळें, फुलें झाडावर) लोंबत राहणें [तुल० का झळी=घुपका] ७ (सूर्यकिरणानीं पाण्यात किंवा मृगजळानें हवेंत) हेलकावे खाणें, हेलकावणें ८ (भूत, पिशाच्च इ०कानीं) पछाडलें—झपाटलें जाणें, चिकटणें ९ झळ लागणें [झळ] **झळंबून धरणें**—(फळें इ०कानीं झाडापासून) लोंबत राहणें, लटकून राहणें, झळंबणें अर्थ ६ पहा

**झळंबुका**—पु झेला, गुच्छ 'वासींगाचे झळंबुक दोहींकडे लागती।' —क्र १३८

**झळंब**—वि १ लोंबणारें, लटकत असलेलें, वाकलेलें, झळंबणारें (झाड) (यामुळें) २ (ल) चढावयास कठिण (वृक्ष, शाखा इ०)

**झळमळणें, झळंघळण**—अकि १ (हालणारें पाणी, काच इ०) चकाकणें, चमकणें २ (झाडाच्या फांद्या इ० वाऱ्यानें) हलणें, हेलकावणें, हेलकावे खाणें [झळ द्वि]

**झळा(ळ्ळा)ळ—ळा—ळी**—स्त्रीपु १ (झळझळचा अतिशय) चकचकाट, लखलखाट, चकाकी, उज्ज्वलता, कांति 'क्वस टिमाचे पाकळ। जळो वरील त झळाळ।' —ज्ञा १३४७४ २ तरग —दार —वि १ चकाकणारा उज्ज्वल, झळकणारा 'वज्रा ठिआ दचाचा पाखा। तुंगापिनाया।' —शिशु १५८ २ उन्हाच्या झळीमुळें उत्पन्न झालेलें (मृगजळ इ०) 'दशाही इंद्रियाच दश विषयरूप मृग त झळाळ उदकापाठि धाआति अज्ञानलें मार्गी रीग।' —क्र १ (टीप) [झळ] **झळाळणें**—चकचकणें, लकाकणें, चकाकणें झळझळणें पहा [झळाळ]

**झळी**—स्त्री (व) झुडप

**झा, झा**—अरि झ्या पहा ०**ड्रणें**—पडुन जाणें

**झाऊ-द**—पु एक प्रकारचें सुरूसारखें झाड, शारणी

**झाऊ**—स्त्री (ना) झळ

**झाकली**—स्त्री (गु.) निळीचा रंग तयार करण्याच्या कारखान्यात निळीचें पाणी साठविण्याकरिता बांधलेला हौद. –कृषि ४१२

**झाकविणें**—झाकविणें पहा

**झाक(क्रा)ळणें**—उक्रि १ झाकून ठेवणें, लपविणें, आच्छादित करणें, दडविणें २ घेरणें, व्यापणें, ग्रस्त करणें, छायेनें आक्रांत करणें, व्याप्त होणें 'झोंपेनें झांकळिला निये।'–मुभादि ५४० –अकर्तृकि १ अंधुक होणें, मलिन होणें, अप्रसन्न येणें (ढग येऊन) 'प्रभा पृथिवीवरी। यज्ञावरी नाकळली भरी।' –एपा १२७ २ झाकळणें, झाकोळणें पहा

**झाकाताप**—पु लपडाव, दपवाडपवी 'प्रगट विवक बोलेना। झाकातापा करी जना।'–दा १९६९

**झाकी**—स्त्री (व) मूक अभिनयाचें नाटक चालत्यावालत्या माणसाचा सिनेमा [हिं झक झाक]

**झांक**—स्त्री १ (प्रा) मूर्च्छा, भ्रमानीमुळें डोळ्यावर येणारी झापड २ अभागी, घेरी (क्रि० येणें, पडणें, घालणें). [झाकणें]

**झांकी**—स्त्री १ शोभिवंत मांडणी, आरास 'श्रावण महिन्यात देवाच्या मंदिरांतून झांकी व रोषनाई होण्याचा रिवाज आहे' –विविध १७० २ ऐट, डौल [झक्]

**झांकु(को)ळणें**—उक्रि १ (काव्य) झाकणें, लपविणें, आच्छादित करणें 'यादव सैन्याचा महागिरी। शरधारीं झाकोळला।' –एरुस्व ८.४९ २ (ल) झाकलें जाणें, फिकें पडणें 'मत्स्य पद्मपुष्पदीपकज्योती। झाकुळल म्हणऊनि उजोती। –वामन, विराट ७१४१ ३ व्याप्त होणें, लिप्त होणें 'परी तयेचिनि उर्मी। नाकोळेना।'–ज्ञा ३७० –अक्रि १ दिपणें, दिपून जाणें, चकित होणें २ बंद होणें, मिटणें (डोळे, पापण्या इ०) 'बुद्धीचें द्वार। झाकोळे जेणें।'–माज्ञा १३११५ ३ अंधारमय होणें, मळकट होणें 'झाकोळलें गगन सूर्य गेला मिळून।'–ऐपो १२० [झाकणें]

**झाके**—अ व्यर्थ-मनको

**झांगड**—स्त्री १एक प्रकारचें वाद्य झगट 'झागड नौबत वाजती गादण।'–ऐपो ११८ २ अनेक वाद्यांचा एकदम होणारा कडकडाट गजर ३ (व) लचाड लिगाड, झगट व्याद 'ती झागड मारे मागें आहे' ४ भांडण कलह बाचाबाच झागडधिंगा [ध्व] **०झांगड**-स्त्री भांडाभांडी जोराचें, हमरीतुमरीचें भांडण वगडा –क्रिवि नगारा, नौबत यांच्या आवाजाच्या दणक्यानें मोठ्या गोंगाटानें गलबल्यानें **०धिंगा**-पु तमाशखडा धागड धिंगा, धिंगाणा, धिंगामस्ती [झागड द्वि]

**झांगड**—न (कु) मोठरा विम्वणाचें जाळें

**झांगड्ड-ट्ट**—वि (कर) उत्तम फक्कड, फक्कड १ प्रेमपात्र, रखेली, यार २ प्रेमरहस्य, गुप्त प्रेम [झगट]

**झांगरा**—पु (मा व) उडवाउडव, थापेबाजी **झांगरें शिकवणें, झांगरेबाजी करणें**-(मा व) उडवाउडवीची उत्तरें देणें, चालताना एखाद्या गोष्टीचा थांग न लागू देणें

**झाज**—न जहाज पहा [फा जहाज]

**झाज**—स्त्री १ पंगा, विशणा २ तार्‍ही, पडदा चुरचुरा पहा. 'वाळियाच्या झाजी। दवण्याचे बुड घालोनी।'–ऐपो १५

**झांज-झ**—स्त्री. एक प्रकारचें धातूचें वाद्य, हें पुरीएवढ्या ४ ताच्या तुकड्याच्या मध्यावर थोडी फुगवटी असलेलें व तींत दोरी ओंवण्याकरितां एक भोंक पाडलेलें असें असतें ओवलेल्या दोरीस बाहेरील बाजूस धरण्याकरिता लाकडाची गोळी बांधतात प्रत्येक हातांत एक झांज घेऊन त्या परस्परावर आपटून भजन, कीर्तनें इ० वेळीं ताल धरतात [ध्व, स, प्रा झस, हिं झांज, सिं झाझु तुल० फा मज] (वाप्र) **झांज खाणें**-(व) सन्यासाची मरवड काढणें झांज झाडणें पहा 'आमच्यावर झांज खाण्यात काय अर्थ आहे' **०झडणें-जाणें**-अक्रि १ दोन्हा हातात असणें, झांजा वाजविल्या जाणें २ एखाद्या कामात असणें, चकमक उडणें, भांडाभांडी होणें, मोठ्यानें ओरडून बोलणें. **०झाडणें**-एखाद्याची खरडपट्टी काढणें, ताशेरा झाडणें **झांजी-ज्या**-वि झांज वाजविणारा [झांज]

**झांज**—स्त्री मूर्च्छा, झीट, घेरी, चक्कर डोळ फिरणें (क्रि० येणें) [स झंझा]

**झाजड-र, झांजरमांजर, झाज(अ)ड माज(झ)ड**—नस्त्री १ पहाटेच्या वेळचा धुसर मुंगसक, झुंजुमुंजु, पहाटेचा ल्व दिसण्याजोगी पहाट (सामान्यतः द्विरुक्तीनें) उदा० 'झाजड झाजड झालें की लागलेंच औषध घ्या' (क्रि० पडणें होणें) २ सायंकाळच्या मधिरप्रकाश 'सध्याकाळीं मागत फिरतो महारा पोरा पसीं चारा। झाजर पडता घेऊन पळ हा गडमुडेचा नित मारा।'–प्रला २४० –क्रिवि अधुकभधुक, मिणमिण [साज १]

**झांजर**—पु (हत्ती बैल घोडा इ० यांच्या पायांत घालावयाचा) वाळ्यासारखा घणघण वाजणारा दागिना –खानगी खातें लागणीचे नियम (बडोदें) पृ ५२ व ५५ [झांज]

**झाजर**—वि जीर्ण झालेला विरविरीत विरविरीत झालेला (कपडा इ०) 'एका अंगावर झाजर शेला तो उठतो चुरचुर।' –पला ८३ [स जर्जर, हिं झांझर=फाटलेला]

**झा(झां)जरणें**—उक्रि १ धमकावणें धासरणें खरडणें, खरचणें 'चंद्रिकेच्या अंगावर झाजरल्यासारखें झालें'–निच १४ २ (ल) (राजा) धमकावणें, एखाद्याला दोषी किंवा गोता धारणें ३ वाप रून खराब होणें, जीर्ण, जर्जर होणें, झिजणें, छिन्नभिन्न करणें, खराब

होणें, करणें 'ती जखम झाजरल्याइतकी . कठीण ठरली नाहीं' –झामू २ ४ (ल) पीडणें, पीडा देणें 'झाजरलीं पचवाणें एक मेकावरी पडितीं हरणें।'–भाए४३० [स जर्जर; म झाजर] (वाप्र) **झाजर माडाचे गरे खाणें–**(उप) झाडावरून पडून अग गरचटल्यानें, ठेचल्यानें पीडित होणें **झांजरता–**वि ओझरता पहा **झांजरसा–**वि शिजलेला, जर्जर झालेला 'दोन्ही खावाला दोन्ही घेरे बाधल्या गरशी। वाकडा हात्रुळा देह झाली झाजरशी।' –पला ८० [झाजरणें]

**झांजरा—**पु खुरपुट, हुरहुर 'शत्रुनें तुज बांधिता रथि दुवरा सम वासरा। फोडिला अनशील तू मज लागला जिवीं झाजरा।'–कुशलवाख्यान ३२ (मराठी ५वें पु आवृति ८, पृ १६१)

**झाजरी—**स्त्री. ल्हान झाज, टाळ 'मोरवग झाजरी पनी-सपत्यही नानापरी।'–राला ३१

**झांजरी—**स्त्री (बे) हुग्गी (गव्हाची कोंडा काढून केलेली खीर)

**झांजरी, झांजी—**स्त्री (व) झोपडीच्या दाराची झडपी (गवत वगैरेची), झाज पहा

**झाजाव(वि)णें—**सकि जोराजोरानें धसधस तोडणें, पुन्हा पुन्हा घाव मारणें, खापलणें, खाडणें, जाजावणें पहा

**झांजु—**न एका विशिष्ट तालात गावयाचे पद, पोवाडा

**झाझ—**झाज पहा

**झांझड-डी—**स्त्री झाजड पहा 'मोटकी जाली झाझडी।' –गीता २ २२८८

**झांझर-री—**स्त्री झाजरी पहा 'नाना ताळ झाझर सुंदर मृदंग।'–सप्र ९ ३१

**झांझरणें—**झाजरणें पहा

**झा झा झा झां—**उद्गा (घोडा, बैल इ०नें) जलद चालावें म्हणून उच्चारावयाचा इशाऱ्याचा शब्द 'झा झा म्हणता प्राण कण्ठासि आले' [ध्व झा द्वि] (वाप्र) **झाझा करणें, झां म्हणणें–**अकि निसटून जाणें, पलायन करणें हातावर तुरी देणें पोबारा करणें

**झाझात—**स्त्री (कर) शिकस्त, पराकाष्ठा अटोकाट यत्न, यातायात (क्रि० करणें) 'त्यानें झाझात केली पण नाहीं एक जुळलें नाहीं' [झा झा?]

**झांझी—**स्त्री (व खा) झाजी, कापसाच्या पन्हाट्यावी विण लेली ताटी [झाज]

**झाझू—**स्त्री १ कटकट, धुमधुरा बोंगाबाली २ झुमझुम छुनछुन असा आवाज [ध्व]

**झां(झा)ट—**न १ (अश्लील) शिस्नाच्या किंवा योनीच्या वरील केस, केसांचा समुदाय, गुह्यस्थानचे केस, शष्प शेट २ –स्त्री सारीं रोंवलेल्या बटा 'मोहाळीं पाखरावरी झाटा। पायीं नोपुरें क्षुद्र घटा।'–गीता १ ४८२ [स जट? प्रा झंटी=ल्हा-नसा केशकलाप, हिं झाट] ०**मुंडावण**–स्त्री गुह्येंद्रियावरील केस काढणें यावरून) (तिरस्कारार्थी) अतिशय क्षुद्र व सोपें काम [झाट+मुंडावण] **झांटोजी–**वि (अशिष्ट) (उप) व्यर्थ पुश रकी मारणारा, ढोंगी, गर्विष्ठ माणूस), क्षुद्र हलका (माणूस) [झाट]

**झाड—**न १ वृक्ष, झुडूप, रोप, वनस्पति (ल्हान, मोठी) 'तूं फिरलास झाडोझाड मीं फिरलो पानोपान'=तुझ्या पेक्षाहि मला जास्त माहिती आहे २ शाखायुक्त वस्तु, पदार्थ, वृक्षाकार वस्तु ३ मेणबत्ती इ० लावण्याचें काचेचें अंबर, पुष्कळशा उदबत्त्या लावण्याचें वृक्षाच्या आकाराचें धातूचें घर 'दादीच्या झाडांतून उदबत्त्या खोविल्या होत्या'–अरतभा १३६. ४ दारू कामातील एक प्रकार, वृक्षाच्या आकाराचें दारूकाम ५ भूतानें पछाडलेलें माणूस 'ज्यास भूत पछाडलें त्या झाडास तें सुमास अन्न खाऊं देत नाहीं'–अरतभा ५८ ६ वंश, वंश वेल ७ (कु) वल्हीचा लाकडी भाग, दस्ता [स झाट, प्रा झाड] (वाप्र) ०**उमें करणें**–उत्कृष्ट रीतीनें एखादें काम करविणें उदा० गायन, वादन, कीर्तन, व्याख्यान इ० इतक्या उत्तम शैलीनें करणें, रंगविणें कीं जणु काय तें करणारा, एक विशाल व फळफुलांनी युक्त असा वृक्षच उभारीत आहे असें वाटावें **कोण्या झाडाचा पाला**–एखाद्याचा दिमाख, नक्षा, मगरुरी उतरण्या करितां उद्धटपणाची उडबुड थांबविण्याकरितां, अभिमान, अधिकार झिडकारण्याकरितां योजावयाचा शब्द, अशा माणसाविषयीं क्षुद्रता व तिरस्कार दाखविणारा शब्दसमूह 'सुभेदार? ह सुभेदार म्हणजे कोण्या झाडाचा पाला? आम्ही ओळखीत नाहीं असें जाऊन सांग जा?'–नाट्यकथार्णव **झाडाचें रांऊन दिसणें, करणें**–भीति इ०कामुळें झाड घोडेस्वार इ०कांच्या आकृतीप्रमाणें दिसणें दोरीचा साप बनविणें (वायवलात मुद्धा अशीच कल्पना जजेस् ९ ३६ मध्यें दृष्टीस पडते) **झाडावरचें भूत**–(ल) ज्याचा नामनिर्देश करणें अनिष्ट आहे अशा नीच, तिरस्करणीय मनुष्याबद्दल वापरावयाचा वाक्प्रचार **सुक्या झाडास वा(पा)क लावणें**–(सुकलेलें झाड इ० त्या दिशेनें वाकविता येणें शक्य नाहीं यावरून ल) एखाद्या उद्धास उपदेश करणें हटी, हट्टवादी, पूर्वग्रहदूषित माणसास बोध करणें (पालथ्या घागरीवरच्या पाण्याप्रमाणें आहे) सामाशब्द **झाडकी**–स्त्री किरे झाडी ०**कुट**–न (गो) वाळलेलें मोडून पडायला आलेलें झाड, फांदी वगैरे ०**खड**–न १ जंगल, झाडी, झाकर झुडूप, राई रान 'विशाळें बहु लागलीं झाडखडें।'–राक ११२ २ झुडूपें, जाळी, ल्हान झाडांचा

समुदाय [झाड+खड] ०खडा–क्रिवि १ (वर दिलेल्या झाड उभें करणें या वाक्प्रचाराच्या उलट अर्थी–झाडाचीं पानें, फुलें, फळें, तोडून टाकलीं असता तें वढव व ओवडधोवड दिसतें या वरून) ओवडधोवड, अधवट, रुक्ष, नीरस अशास्त्रीय, अव्यवस्थित, बेशिस्त असें (गायन, वादन, कीर्तन, व्याख्यान इ०) २ गुरूपाशीं अभ्यास न करता नुसतें ऐकून आपल्याच अकलेनें वाज विणारा व त्यानें तें वादन, स्वयसिद्ध (गवयी, वादन) 'त्याचा थाणा, वाणी, गाणें, वाजविणें, म्हणणें, झाडखडा आहे' [झाड+खडणें] ०खंडी–स्त्री (व) झाडें व झुडपें 'दरें दर्कुटें झाडखडी अनेकी।'–दावि –वि अरण्यमय, जंगलाचा (प्रदेश, जागा इ०) [झाड+खड] ०ाळ–वि वृक्षमय झाडखडी पहा ०झुडला–पु (व्यापक) लहानमोठ्या झाडाचा समुदाय, वृक्ष, झुडुपें, रोपटीं [झाड द्वि] ०झाडोरा–झुडपी–झुडुला–झुड–झुडुप–पुस्त्री न लहानमोठ्या झाडाचा समुदाय (समुच्चयार्थी, एकूणएक किंवा कोणतहि) झाडझडुप पहा ०दस्त–पु फळझाडावरील कर 'झाडदस्त झाडे सुमारी ३१ येकूण रुपय' –मसाप २।१४१ [म झाड, फा दस्त=कर] ०पंचाल–वि १ (माकड अतिशय चपळ असल्यानें तें जणु काय एकाच वेळीं पाच झाडावर असल्याचा भास होतो यावरून) चपळ, तरतरीत, टुणटुणीत, चलाख २ चचल, चळवळ्या, चुळबुळ्या, पायावर भोंवरा असलेलें (मूल इ०) ०पदरी–वि किनारीमध्यें रेशमाचीं झाडें, फुलें काढलेलें (वस्त्र इ०) [झाड+पदर] ०पाला–पु १ (व्यापक) (औषधाच्या उपयोगी) वनस्पती, त्याचा पाला, मुळें इ० (सामा) वृक्ष, वनस्पति २ (व्यापक अर्थी) खाण्याच्या उपयोगाचा भाजी पाला, पानें इ० ०पाल्याचें औषध–न वनस्पतीपासुन तयार केलेलें औषध, याच्या उलट रसायनी औषध–खनिज धातु–पदार्थ इ०कापासुन केलेलें [झाड+पाला] ०पेढ–ड–माड–पु (व्यापक) झाडमाडोरा पहा [हिं झाड+पेड=झाड माड] ०झाडरू–न लहान झाड, झुडप 'या बाजूस रानातून, डोंगरावर दवणा, रामाळा, वगैरे झाडरूख खड' –वेया ४३ [खड] झाडदारे–स्त्री वस्त्रावर काढलेलीं झाडाझुडपाचीं चित्रें –वि झाडाचीं चित्रें ज्यावर आहेत असें (वस्त्र, भित, जमीन) झाडझना–वि (शब्दश अश्लील, पण तो अर्थ मनात यत नसल्यानें रूढ) उनाड, भटक्या, भणग, भटकभैरव, उडाणटप्पू [झाड+झवणें] झाडळ–ळी–स्त्री दाट झाडी, राई 'जीवधर्मांचिया झाडळी। मनोरथाचिया वशजाळी।'–ज्ञाप्र २१६ झाडसुनें–न झाडकुत्रा कुत्र्याची एक जात 'पाणसुनीं झाडसुनीं। नाना प्रकारींचीं सुनीं। –दावि २४४. [झाड+स शुन=सुना]

झाडण–स्त्री १ केरसुणी, झाडणी २ झाडण्याची क्रिया ३ (ल) (कर्जे, अवसामुग्री इ०काची) नि शेषता करण्याची क्रिया, फडशा पाडणें, देणें वारणें, काम पार पडणें [झाडणें] घको. ३ ५५

'झाडणा–वि झाडणारा 'मी झाडणा मी खिलारी।'–एभा १२ ५६१ [झाडणें]

झाडणी–स्त्री १ (खा को) झाडण, केरसुणी 'चित्तीं म्हणे नृप अहा चवरी ती झाडणीच कीं केली।'–मोआदि १२ ७८. २ झाडणें, झाडून, झटकून टाकणें ३ अगातील भूत, पिशाच्च इ० मन्त्रतन्त्रानीं काढणें, पिशाच, विष डोळ्यातील फूल इ०काढण्या करिता मान्त्रिक करतात तो टाहाळ टाकण्याचा विधि, हकालपट्टी. 'अहमहिपासुर लागला जनीं। त्यासि करावया झाडणी। कृष्ण गुणी चालिला।' –एभा १२०८ ४ (ल.) रागें भरणें, कानउघाडणी, खरडपट्टी खडसावणी, निर्भर्त्सना [स झाटन, प्रा झाडण]

झाडणें–उक्रि १ (केरसुणी इ० नीं) केरकचरा काढून साफ करणें जागा निर्मळ करणें २ हसडणें झटकणें झटक्यानें हलविणें (ओलें वस्त्र, शेंडी इ०), (हात, पाय डोकें इ कास) झटका देणें 'झाडिता आपला हात। तव आगासि असे जडित।'–परमा १० १९ ३ लोटून देणें 'त्यातें उडोनि झाडी झाले ते चूर्ण जेविं नगपातें।' –मोवन १२ २९ ४ काढून टाकणें, नाहींसें करणें लोक पारखुन सोडावे। राजकारणें अभिमान झाडावे।' –दा ११ ५ (विस्तव इ० कास) पखानें वारा घालणें, झड पणें ६ खरडपट्टी काढणें, खडसावणें, निर्भर्त्सना करणें 'थाळ्या आणि नयाला लक्ष्मीकांतूनीं चागलेंच झाडलें' –सुद ५२ ७ (मागणाराचा, भिकाऱ्याचा) निषेध करणें, मनाई करणें, साफ नाकारणें, वदी करणें 'अतींच स्मरावें श्रीरामराम। ऐसा कितेका जडला भ्रम। अमो गृहस्थानें भजनप्रेम पाहोनि मस्तक झाडिला।' –दावि २०२ ८ (सरकार, सावकार इ० काची) बाकी काढून टाकणें, देणें बेबाक करणें 'धन्याची बाकी हळु हळु झाडा।' –भज १३४ ९ (अगातील भूत, पिशाच्च इ०) काढणें, हाकलून लावणें १० (बदूक इ०) उडविणें, गोळी मारणें –अक्रि (बदूक इ० कानीं उडताना हात इ० अवयवास) हिसडा, झटका देणें [स झाटन, प्रा झाडण, हिं झाडना, गुज झडिसु=टाकणें, फेकणें, झाडणें=केरसुणी फेकणें] ०झट कणें–उक्रि केरसुणी इ० कानीं झाडून, फटक देऊन, धूळ उडवून साफ करणें, निर्मळ करणें झाडझपट–झटक–स्त्री १ (व्यापक) धूळ, केर इ० काढण्याचा, झाडण्याचा झटकण्याचा व्यापार, झाड झुड सडासमार्जन २ (ल) (व्यापक) चोरीच्या म्हणून समजल्या जाणाऱ्या लुबाडणें लुटणें इ० सव क्रिया 'त्यानें आजपावेतों झाडझपट करून पोट भरलें ३ लुटालूट, धूळधाण, दाणादाण 'पेंढा यानीं त्या गावात जाऊन झाडझपट केली' [झाडणें+झपाटणें] झाडझुड–स्त्री धाडझपट अर्थ १ पहा 'माझी झाड झुड होईतों तू पाणी घेऊन य' [झाडणें द्वि] झाडपट्टी–स्त्री १ जमीनीचा सारा किंवा घरपट्टी यावद्दलची बाकी चुकती

फणण्याची गरजेची मागणी २ (उप) गरहपणी, गडझावणी, पाणी (क्रि० करणें) [झाडणं+पणी=त्र] **झाडपाखड**–स्त्री १ (धान्य इ०) सुपानें पाखडण्याची, झटकण्याची साफ करण्याची क्रिया २ (ल) कवडीकवडीचा हिशाब देणें–घेणें [झाडणें+पाखडणें] **झाडपि(पी)ड**–स्त्री झाडझूड, झाडलोट 'झाडपीडी कर्मनि मागऊ सनाल।' –दावि १५१ [झाडणें द्वि] **झाडपिड्या**–वि देऊळ मंदिर इ०कांचा झाडझूड, साफसूफ करणारा [झाडपिड] **झाडपानें**–न कर्जेकरीचा शाब्दिक हल्ला [झाडणें+पानें] **झाडफूक**–स्त्री (ना) अंगारा, धुपारा, मांत्रिकाकडून करावयाचा मंत्रोपचार (क्रि० करणें) [झाडणें+फुंकणें] **झाडफेड**–स्त्री (राजा) झाडझूड झाल्गाट. [झाडणें+फेडणें] **झाडझाडी**–स्त्री १ (कर्ज अनामतुन्गी इ० कांची) पूर्ण निपटारा, वसूल निरानिपटा २ कर्जेकरीचा शाब्दिक हल्ला (क्रि० करून टाकणें, करणें) [झाडणें+फाडणें] **झाडलोट**–स्त्री केर काढणें, मार्जन इ० झाडझूड [झाडणें+लोटणें] **झाडलोटथा**–वि झाडलोट करणारा –मगाप २ ५ ३९७ [झाडलोट] **झाडवण**–स्त्रीन झाडण्याची क्रिया –पु (काव्य) १ झाडणारा 'चोखामेळा म्हणे मी तुमचा। झाडवण त्याचा म्हणवितों।' २ केरसुणी, झाड [झाडणें प्रा झाडवण] **झाडसारव, झाडवणसारवण, झाडसारवण**–स्त्री (समुच्चयानें) (घर इ०) झाडणें व शेणानें सारवणें इ० क्रिया; साफसुफी 'झाडसारवण वगैरे करताना त्याची ओं उकिरड्यासारखी हात ऊमटील यात काय नवल!' –नाट्य ३९ [झाडणें+सारवणें] **झाडून**–क्रिवि एकंदर सर्व, यच्चयावत्; एकूणएक एकहि न वगळतां 'यदुसचिव पौरमुख्य दुत आणविल सभेंत झाडूनी।' –मामोसल २ १९ –पया ७९ [झाडणें]

**झाडन-नी**–स्त्री झाडणी, (व) गवताची केलेली केरसुणी

**झाडनी**–स्त्री झाडणी अर्थ ३ पहा (क्रि० करणें) भूतबाधा झालीसे इनाम करा झाडनी यावडी।' –होला १४१ [झाडणी]

**झाडनी**–स्त्री (व) कडाक्याच्या थंडीनें किंवा फार आंबट पदार्थ खाल्ल्यानें (मनुष्यानें केलेली) हात पाय झाडणें इ० झाडण्याची क्रिया; शहारे आल्यासारखें करणें (क्रि० देणें) [झाडणें]

**झाडपचाळ**–पु सोनारांतील एक पोटजात किंवा त्या जातीचा मनुष्य (सोनार ही जात पांचाळ ब्राह्मणांपैकीं आहे) [झाड+पांचाळ]

**झाडवळ**–वि झाडवाला 'आवघ झाडवळी महार। उतरले पार सत्तासंगें।' –भग ६३ [झाडणें+स मतु हिं वाला; म वळ प्रत्यय]

**झाडा**–पु १ (कायदा सामानसुमान इ० कांची सरकारी नोकरानें केलेली) झडती; बारीक तपासणी (क्रि० घेणें) २ (सामा) हिशेब चुकता करणें; हिशेब देणें–घेणें मिटविणें ३ (ल) धुणें। कांहीं लपवून न ठेवतां उघड करणें; खरें स्वरूप प्रकट करणें; झाडा देणें 'अहंतादि भावां आपुलियां। झाडा देऊनि आघवयां।' –ज्ञा १५ २७९ ४ शुद्धत्व; मलविसर्जन मलशुद्धि ५ फडशा, निकाल, फडशा; निरास 'त्याच दिसीं झाडा द्रव्याचाही जाला।' –रामदासी २ ९९ ६ (गो गा) (भूत पिशाच्च, विखार इ० काढण्याकरितां मांत्रिकानें) टाहाळ्यानें, केरसुणीनें केलेली झाडणी (क्रि० घालणें) [स झाटन; प्रा झाड हिं झाडा, गु सिं झाडो] (वाप्र) **०करणें**–१ कर्ज फेडणें 'झाडा करून देऊ' –भाअ १८१५ २७९ २ नाश करणें, निकाल करणें 'ऐसा द्वादश वर्षे झाडा केला।' –जै ३० १७ ३ शौच करणें, परसाकडे जाणें **०घेणें**–बारकाईनें कसोशीनें तपास करणें 'छप्परबंदाच्या तळाचा झाडा बारकाईनें घ्यावा' –गुजा ४६ **०पुसणें**–विस्तारपूर्वक सांगणें 'श्रोते म्हणती न पुसों झाडें। सम निवारें लागोंदा।' –एहस्व १५ १५९ **०होणें**–संपणें 'आता बातमी हरकारे झाडा झाले लवकरी आणीक पाठविणें' –पद १० ११ **झाड्यास जाणें** शौचास जाणें सामाशब्द– **०झटका**–पु (व्यापक) १ सरकारी नोकरें इ० कांवर केली जाणारी झडती तपासणी इ० २ शौचमुखमार्जन, परसाकडणें तोंडधुणें इ० [झाडणें+झटकणें] **०झडती**–स्त्री १ (व्यापक) झाडाझडती अर्थ १ पहा २ (एखाद्याकडून) कवडीकवडीचा हिशेब घेणें, हिशाबाची कसून केलेली तपासणी विचारणूक (क्रि० घेणें) [झाडा+झडती] **०पत्र-पत्रक**–न मामलेदारानें ठेवावयाचें वसुलाच्या झाड्याचें मासिक पत्रक निकालपत्र पहा [झाडा+पत्र-कागद] **०पवाडा-पाडा**–पु १ कसून हिशेब मागणें; कडक रीतीनें जाब विचारणें २ अशा तऱ्हेनें दिलेला हिशेब जाब झडती (सामान्यत अनेकवचनीं प्रयोग) (क्रि० करणें; देणें; घेणें होणें, येणें) 'न पुसेचि बाकी नव्हे झाडापाडा।' –तुगा १५४३ 'या कामाविषयीं कोठें झाडेपवाडे द्यावे लागतील काय कोण जाणे' [झाडा+पवाडा=पाडा] **०बाकी**–स्त्री (कर्जाच्या) बाकीचा निकाल फडशा 'नामदेवा म्हणती घ्यावा जन्म तुम्हीं। झाडाबाकी आम्ही करूं पर्वे।' –रामदासी २ १४३ [झाडा+बाकी] **झाडावा**–पु तपासणी, शुद्धि –दार [झाडा] **०वारन्ट**–न (कायदा) जंगम माल शोधून काढून मॅजिस्ट्रेटकडे हजर करण्याबद्दल पोलीस अमलदारास दिलेला हुकूम (इ) सर्चवॉरंट [म झाडा+इ वारन्ट=आज्ञा परवाना] **झाडेकरा**–पु (जकातीच्या नाक्यावर नेमलेला) झाडा घेणारा अधिकारी; जकात अंमलदार [झाडा+करणें] **झाडेकार**–पु (गो) भूतबाधा घालविणारा विष इ० उतरविणारा मांत्रिक [झाडा+करणें] **झाडेभवाडे**–पुअव (व) १ अळंमळ हयगय दिरंगाई 'आतां का झाडेभवाडे देता' २ हाल हालअपेष्टा भोग 'आमच्या जिवाचे झाडेभवाडे आहेत' [झाडा+भोंवाडा]

**झाडी**—स्त्री १ झाडणें, झाडून टाकण्याची क्रिया 'मुरडिवें आगें झाडी करितु। अनियाळा डोळा भेंज घेतु।'—शिशु ७१० २ निकाल, फडशा झाडा पहा ३ शुद्धि 'देहजाड्याचिया किटा। आग्निपुटीं सुभटा। झाडी कीजे'—ज्ञा १७ २०९ ४ लावविणें; पळविणें [झाडणें] ०करणें—झाडून टाकणें, निकाल, नाश करणें 'स्वानंदें तृप्ति झाली। झाडी केली भवरोगा।'—एभा १० २९

**झाडी**—स्त्री १ जंगली किंवा झाडाझुडपांनीं व्यापलेला प्रदेश, राई, झाडाचा समुदाय 'ज्याच्या रम्य तरुवरी पसरल्या झाडया किती सुंदर।'—केक १२८ २ झाडोरा, झाडझुडपांनीं व्याप्त अशी अवस्था, निबिडता ३ (ना) चांदा व भंडारा हे अरण्यमय जिल्हे, याना झाडीपट्टी असेंहि म्हणतात [म झाड, का झाडी] ०वाट—स्त्री झाडींतून, जंगलातून जाणारी वाट, जंगलातील पायवाट या वाटेंत चोराची फार भीति असते 'झाडीवाट ते नेणती स्वामी। पुनासी न धाडिता समागमीं।'—दाति ३९२ [झाडी+वाट]

**झाडी**—स्त्री (हेट नाविक) गलबताच्या वाकाच्यामध्यें उभें घातलेलें लाकूड, (गलबताच्या) वाकाची वाटी व भाग व गलबताची एकएक बाजू यास जोडणारा तिरपा वासा [झाड]

**झांडी**—स्त्री (ना गोंडी) एक ल्हानसें लाकडी टाळासारखें गोंडी वाद्य [झाज, झाजडी]

**झाडू**—पुस्त्री १ केरसुणी, खराटा २ रस्ते झाडणारा, विशेषत भंगी, हलालखोर 'ही बया माझ्या शिकारखान्यामधीं झाडूचं काम करीत व्हती'—वाय २६ [झाडणें, हिं गु झाडू] ०खोर—पु (ना) भंगी, मेहतर ०वाला—वि रस्ते झाडणारा; भंगी 'पहिल्याच झपाट्याला झाडुवालीचें काम पत्करते'—नाकु ३ ३८ [झाडू+वाला=धंदेवाचक प्रत्यय]

**झाडोरा, झाडौली**—पुस्त्री (कों) १ दाट, गर्द झाडी, राई २ त्यामुळें होणारें अभेद्यत्व, दाट झाडेंझुडपें असणारी जागा. 'कल्पतरूचे झाडोरे।'—वेसीस्व ९ २० 'विचित्रा वेदवेलीं। दिसती सहजें सिद्धाओळीं। भावा भावाचिआ झाडौली। चर्होंकडे।'—दाव ४४४ [झाड+आवली=रांग]

**झाडया**—धाना १ झाडूवाला, भंगी, हलालखोर २ सोदा, उचल्या, भामटा, चोर [झाडणें]

**झाडया**—धाना पिशाच्च किंवा देव यानीं पछाडलेला मनुष्य, (भूताचें, पिशाच्चाचें) झाड [झाड]

**झांनन**—पु झनझन असा आवाज, झणझणाट झणत्कार छुमछुम, रुणझुण नाचण्याचा आवाज छनन पहा 'धिमकी धिमकी धिमधेरी—झननन झानन झनत्कारी।'—राला ३८ [ध्व झन्]

**झांप**—पु १ काटेरी झुडपाचें दाबून बांधलेलें मोठें ओझें, काट्याचा भारा २ झाडाची मोडलेली फांदी, झाकर ३ (कों) नारळीच्या झाडाची फांदी झावळी, सावळी ४ नारळीची, माडाची चटईसारखी विणलेली झावळी, सुडनन, सावळींचा पळलेला तट्या, घरई हा छपराला उपयोगी पडतो ५ गुरें जाऊ नयेत म्हणून केलेलें फाटक, दुबळकें मेरें, आंगर, झापा ६ दाराचें, खिडकीचें झडप, फळी ७ शेतातील गवताचे झोंपडी, गुरवाडा 'शेतात एकदोन घरें असली तर त्याना झाप म्हणतात'—गागा २ ८ कोंबडयासाठीं मोठया करंडयाच्या आकाराचें केलेलें तट्याचें खुराडें [प्रा झप=झाकणें, हिं झाप=झाकण, गु झाप=जाळें] ०टळ—न माडाची जुनी झावळी, जुनी झाप [झाप+टळ प्रत्यय]

**झांप**—न (गो) गुनागुत, घुसणी पहा [गु झाप=नाळें]

**झां(झा)प**—स्त्री. १ पक्ष्याची झडप झेंप, उडी (क्रि० घालणें) २ (मनुष्य पोहताना, साप सरपटताना, फरेवरील मूल एखाद्या ओळखीच्या माणसाच्या पुढें केलें असताना कर तात ती) शरीराचा पुढील भाग थोडा उचावून पुढें झोंकण्याची क्रिया, झेंप (क्रि० टाकणें, मारणें घालणें, खाणें) ३ (चोर इ०काचा) हल्ला, छापा. (क्रि० घालणें, पडणें) [स झप=उडी, बुडी, व झॉप तुल० इ जप्=उडी]

**झांप**—स्त्री (मूर्च्छा, भूतबाधा, पित्त इ०मुळें डोळ्यावर येणारी) गुंगी, झापड, ग्लानि, तद्री [स स्वाप (झोंप)-स्वाप-झाप-झाप —भाअ १८३४]

**झां(झा)पड**—स्त्री १ (पित्त, मूर्च्छा इ०मुळें डोळ्यावर येणारी) झाप, गुंगी, ग्लानि, तद्री, झोंपेचा पगडा, डोळे मिटू लागणें (क्रि० पडणें, घालणें) निद्रेच्छा, सुस्ती 'या स्वामीस लागलें वेड। सादर मृत्यूझापड।'—नव १५ ७४ २ ढगाची अधारी, काळोखी, मळभ (क्रि० घालणें) 'मेघानी, पाव सानें झापड घातली' ३ तोंडावरून पांघरूण घेणें, वस्त्रानें तोंड झाकणें (क्रि० घालणें) ४ (ल) भूल, मोह, भुरळ 'याम कालगतीमुळें झांपड पडली'—भाव ४८ ५ (ना) आटोक्, तावड, धाप 'लोक त्याना फितविण्यास आले परंतु ते त्याच्या झापडींत आले नाहींत'—सन १८५७ ४०८ ६ (खा) पहाट, उषःकाल, झाझरमाजर ७ जनावराच्या डोळ्याना बांधतात ती ढापणी [झापणें, झाकणें] ०देणें—(व) १ एखाद्याच्या तोंडावरून हाताचा पंजा उलटा करून डोक्याकडून खालीं उतरणें २ (ल) फसविणें

**झा(झा)पडी**—स्त्री १ झापड अर्थ १ पहा 'याण सुटले कडाडी। पडली डोळिया झापडी।'—एरुस्व १० १९ २ अंधारी, झापड अर्थ ७ पहा 'का तेलियाचा ढोर पाहीं। डोळा झापडी स्वदर्शी।'—एभा २१ २३१ ३ तोंडावरून वस्त्र गुंडाळणें, घुंघट, बुरखा ४ (व) पावसाची झडप घरात येऊ नये म्हणून दार वर, खिडकीवर केलेली पत्र्याची, गवताची छपरी, झटप, पाजी ५ (सामा) झापड पहा

**झांपण**—न झापड अर्थ १ पहा (क्रि० पडणें घालणें) —न १ झाकण झापण २ झापडीच्या दाराची झडपी, झापा [झापणें]

**झांपणी**—स्त्री १ अंधारी, झापड, झापण २ झाकण, झापण [झापणें]

**झांपणें**—उक्रि झाकण घालून बंद करणें, झाकणें, झाकण ठेवणें [झाप, हिं झापना]

**झापणें**—उक्रि (प्र) झेंपणें पहा

**झापर**—न (ना) झोपडीचें फाटक, झापा [झाप]

**झापरें**—न (ना) डोक्यावरील केंसाचें छप्पर; झिपऱ्या —वि केंसाळ [झिपरी]

**झांपा**—पु (धुपण, झोंपडी, गोठा याचा) तट्या, कामट्या, गवत, झावळी इ०चा केलेला दरवाजा, फाटक, झाप 'रोज चार वाघीर मारती, मुडकें उडविती दरक झाप्यास।'—गापा [प्रा झप=झाकणें, गु झापो] म्ह० बैल गला झापा केला=वगतीमागून घोडे याप्रमाणें

**झापा(प)ळ**—न, १ झाकर, गर्द छाया, झाडाच्या फांद्यांचा निबिडपणा, दाट झाडी २ ढगाची अंधेरी (क्रि० येणें) दाट फांद्या असलेलें (झाड), गर्द, निबिड, घन, दाट [झाप] **झाप(पा)ळणें**—अक्रि १ (झाड) दाट फांद्यांनीं, पालवीनें युक्त होणें, गर्द, घनदाट होणें २ (मेघ इ०नीं आकाश) दाटणें, व्यापणें, झाकोळणें भरून येणें [झापाळ]

**झांपाळो**—वि (गो) झोंपणारा, झोंपाळु

**झांपी**—स्त्री झापड —शर

**झाब**—स्त्री (खा) घेरी, मूर्च्छा —मादै ७ १-४

**झाबड**—वि (व) अगदीं वृद्ध, म्हातारपणामुळें रोड झालेली, अस्खड (स्त्री) 'झाबड झाली आहे बाई, पण तिचे ढंग कायम आहेत' [झाबड?]

**झांबड**—स्त्री १ हिसकावून घेणें २ (ल) लुबाडणें, लुटणें, लूट [झोंबड]

**झांबड**—स्त्री झापड, अंधार, काळोख (क्रि० पडणें) [झापड] **झाब(बा)डणी**—स्त्री हिसकावून घेणें, रटमार, लुटा लूट नागवणूक [झोंबडणें] **झांब(बा)डणें**—उक्रि १ हिसकावून घेणें हिसडणें, हिसकणें जोरानें ओढणें 'शिरींचा पाडोनिया मुकुट।दाहाही झांबाडिले वट।'—भारा किष्किंधा १६ १३६ २ लुटणें उबाडणें नागविणें बुचाडणें [झोंबडणें] **झांबडाझाबड**—स्त्री १ जोराची हिसकाहिसक, ओढाताण, झोंबाझोंबी २ लुटा लूट [झाबड द्वि]

**झाबड**—वि बडील अतिशय मोठा अवाढव्य

**झाबड-ड्या**—वि गोंधळ्या झाबऱ्या भाऱ्या; भ्रमिष्ट

**झाबडणें**—अक्रि (राजा) (आजारीपणामुळें) सुस्त होणें, मंद होणें मरगळणें

**झाब(म)रा-ऱ्या**—वि (राजा) (वर्तनांत, दिसण्यात) गोंधळ्या, विसराळु; भ्रमिष्ट, मगरूल्या, मगाळ्या, चुका करणारा [झाबड]

**झाबवला**—वि अशुद्ध, अस्पष्ट, मंद 'ना दिवस नव्हे सोज्वळ। जैसी झाबवली सांजवेळ।'—एभा २५ ०५१ [झाबड]

**झावळ**—स्त्री दुःख, जाळपोळ झाबड पहा

**झावळा**—पु (कु) दोऱ्याची विणलेली पिशवी, जाळें झारें पहा

**झावळी**—स्त्री १ (कों हेट) पकडलेले मासे ठेवण्याची कोळी लोकांची लहान जाळें २ (हिं) झाडय़ा सुताची विणलेली जाळी दार पिशवी (कु) गवत ठेवण्यासाठीं बैल्गाडीच्या खालीं असलेली जाळी

**झावा-वू**—पु तेल ठेवण्याचा ओतण्याचा चामड्याचा बुदला, तलाचें कातडी भांडें [हिं झावा]

**झावू**—वि (प्र) झावू झाऊ झाऊ पहा

**झामड, झामडणें**—झाबड, झाबडणें इ० पहा

**झामरा**—वि केंसाळ, फार केंस असलेली कुत्र्यांची जात, (ल माणसासहि म्हणतात)

**झायाझुया**—स्त्रीअव (ऊन्ह ताप यामुळें दिल्या जाणाऱ्या माळ्या) धापा सुस्कार; श्वासोच्छ्‌वास (क्रि० करणें, देणें, टाकणें, हाणें) हायतुरश —क्रिवि धापा टाकीत लाहऱ्या, अहाळ्या देत [प्रा झाय=जळलेलें, दग्ध किंवा झाय ध्व]

**झार**—स्त्री (राजा) तांदूळ इ० धान्याचे कुटल्यानंतर, दळल्यानतर चाळणीनें चाळून राहिलेले अतिशय बारीक कण [स क्षर-क्षार् किंवा क्षर् प्रा झर]

**झार**—पु १रशिया प्रजासत्ताक होण्यापूर्वीच्या राजघराण्यातील राजाची पदवी २ (ल) जुलुमी राजा [लॅ सीझर, रशि झारी] **०शाही**—स्त्री १झाराचा अंमल राज्य २ (ल) झार बादशहाच्या प्रमाणें जुलुमाचा व दडपशाहीचा अंमल 'सरकारच्या झारशाही जुलुमाचा निषेध केला आहे'—क ७ ३०

**झार**—पुन शेवाळासारखा नदींतून वाहून तीरास लागणारा एक बुळबुळीत पदार्थ —शर

**झार, झारॅ**—न (कोळी) समुद्रांतील एक प्राणी याच्या समुदायास आकृतीवरून पोर्तुगीज लोकांचें ल्याड जहाज या नावानें संबोधितात (इं) फिझेलिया —प्राणिमो १४२ [देप्रा झारुआ= क्षुद्रजंतु]

**झार**—वि (तंतुवाद्याच्या तारेस झारा लाविला असता होणाऱ्या आवाजाप्रमाणें) खणखणीत उंच आवाजी पण्याची (कंठ, तंतुवाद्य इ०) [ध्व]

**झार**—रि (गो.) अतिशय कडु, कडू जहर 'औषध कडू झार झालें आहे' [जहर]

**झारगें**—न (को) मळणी झाल्यानंतर प्रथम ज्या चाळणीनें धान्य चाळतात ती झाळण, चाळणी [झारा]

**झारणें**—न १ (झाडावरून फळें काढण्याची) जाळी लावलेली आकडी, झेला २ (सामा) जाळें, पिशवी ३ (कु) नारळ वगैरे आणण्यासाठीं दोऱ्याच्या जाळ्याची केलेली पिशवी, थैली झावळा पहा [स क्षृ-क्षर् किंवा क्षर्]

**झारणें**—उक्रि १ (राना) (माती, पीठ इ०) चाळणें, गाळणें २ सोनाराच्या शेगडींतील राख, माती इ० चाळून त्यांतील सोनें काढणें झारा, झारेकरी पहा [स क्षृ-क्षर् किंवा क्षर्, प्रा झर]

**झारवा**—पु १ (उसाचा रस कढत असताना त्यावरील किंवा तेलावरील) मळी काढण्याची अथवा छाटून काढण्याची परडी, झारें, टोपली २ तेलातील गाळ –शर [झारणें]

**झारय**—स्त्री (गो) खेकडे धरण्याचा गळ [झारा]

**झारा, झारी-झाऱ्या, झारिया, झारेकरी**—पु १ सोनाराच्या दुकानातील राख विकत घेऊन किंवा रस्ता इ०कातील पडलेला केरकचरा इ० चाळून गाळून तींतून सोन्याचे कण काढून त्यावर चरितार्थ करणारी एक जात व तींतील व्यक्ति 'मिरविति गुणज्ञ कनका काढी सुक्ष्मा जपोनि झारा ज्या।'—मोमभा २ १ –स्नाम ४४ धुळी माजीं सोनें जैसें। मेसळलें न दिसे। तें निवडी जाणे जैसें। झारियाचि पें।'—विउ ४ ५९ 'सरंजामदाराची झारेकऱ्याप्रमाणें चौकशी सुरू झाली' २ (ल) कृपण कद्रू [झारणें]

**झारा**—पु १ वीणा इ० ततुवाद्याच्या घोडीजवळ तारेखालीं घातलेला कापूस, लोकरीची दशी जिव्हाळी (ह्याच्या योगानें आवाज चढा होतो) २ ततुवाद्यातील खर्ज स्वराची पितळी तार ३ झाऱ्याच्या योगानें निघणारा चांगला आवाज या आवाजासारखा कंठांतून निघणारा आवाज [ध्व झार]

**झारा**—पु १ दांडा असलेलें व एका टोकास सपाट वाटोळें व सच्छिद्र असलेलें स्वयपाकाचें पळीसारखें उपयोगी उपकरण यानें तळ गळून कढईंतील तळलेले पदार्थ वर काढता येतात तजावरकडे याला चारीची पळी म्हणतात २ गाळण्याचें साधन गाळणी 'नीर बहुत ठाईं हिंडलें। झारा घातला मग निवळलें।' –दावि ७७४ ३ पाणी तापविण्याच्या बंबातील विस्तव ठेवण्याची जाळी [स क्षृ-क्षर् किंवा-क्षर् प्रा झर फा मिर]

**झारी**—पु झारेकरी कीं धुळींत हारपलें मुक्त। त्यांतीं निवडी सावचित्त।'—रावि ३१ ४५ [झारणें]

**झारी**—स्त्री १ लांब गळ्याचें पाणी थंड राखण्याचें (विशेषत जस्ताचें) भांडें २ तोटी असलेला गडू 'निघे न झारींतुनि नीरबिंदु।'—वामन, वामनचरित्र १ ? ७ ३ झाडांस पाणी घालावयाचें जस्ताचें भांडें याला एक लांब तोटी असून तिचें तोंड पसरट व सच्छिद्र असतें ४ चहाची किटली ५ तोटी [स क्षृ-क्षर् क्रिा क्षर् प्रा झर मि झारी] °चा अपकरा पु पाणी पिण्याचा तोटीचा अपकरा गडू °ची पर्डी–स्त्री (तंजा) झारा

**झारें**—न झारवा अर्थ १ पहा

**झारेकरी झाऱ्या**—झारा, झाऱ्या पहा

**झाल**—स्त्री १ डाळी, वद्रो करलेलें उथळ व पसरट शिपतर २ या शिपतरात वणकीचे दिवे, फळें (आणि मराठवाडात) पुरणपोळ्या, कच्चे पापड इ० पदार्थ ठेवून याची पूजा करून ती विवाहसमारंभात वधू वरगृहीं जाण्याच्यापूर्वी वराच्या आईस दान करितात, तो विधि ऐरणीचालर पहा 'चरव्या घागरी आणी झाली। हार डेरे रत्नाचे।' –वमीस्व १४ ३९ [का जगी= वाटोळी वेळूची टोपली (धान्य ठेवण्याची), दुरडी ? झारगे, झालर पहा]

**झाल**—स्त्री १ (कु) सुरमाडाच्या फळाचा व फुलाचा लोंबता घोस २ सुरमाडाच्या पानाचें केलेलें पायपुसणें –पु पुढील बैलाच्या शिंगाला बांधावयाचा केसाचा गोंडा [प्रा झुत्र म झुलणें ?]

**झाल**—स्त्री १ एखाद्याच्या अंगावर लहान मुलानें टाकलेली थेंब उडी, झाप (क्रि० टाकणें) २ (गाट्याच्या खळांत) गोटी विशिष्ट मर्यादेच्या बाहेर पडणें, फेकणें (क्रि० खाणें) ३ एखाद्यावर रागानें धावून जाण्याची क्रिया (क्रि० जाणें) ४ झोल झोकाडी, चाचरी (क्रि० जाणें) –वि (प्र) जहाल पहा [झोल] °जाणें–(कोणाएकावर) त्याला उद्देशून अमर्याद भाषण करणें

**झाल**—स्त्री (नाव) सायंकाळचा अंधार झांपड 'आम्ही बाजारातून परत आलों तों चांगलीच झाल पडली होती, लांबून माणूस ओळखता येईना' [स ज्वाल ?]

**झालणा**—पु (को) बांबूच्या कड्याला अडकविलेलें मासे धरावयाचें हातजाळें हल्लीकडे ह्याला हातझालणा असेंहि म्हणतात व रत्नागिरीकडे हातविंड हें नांव आहे [म जाळ म झाल]

**झालर**—स्त्री १ मंडप छत झगा इ० कास शोभा आणण्यासाठीं लावावयाचा चुण्या घातलेल्या कापडाचा पट्टा सजाप, मगजी नक्षीदार कांठ २ (नाट्य) राक्षसाच्या मोंगानें नगाव याचा लुगड्याचा-चुण्या पाडलेला-घागरा ३ (नाट्य) पडद्याच्या वरच्या बाजूस लोंबणारा कापडाचा चित्रित पट उदा० महालाची, आकाशाची जंगलाची झालर [हिं झालर]

**झालर**—स्त्री १ गुऱ्हाळांतील मादण किंवा नांद यावरील विळ्याचें करलें झाकण, चाळणी, उसाचा रस गाळून घेण्याची विरळ विणीची टोपली २ विवाहसमारंभांत वरातीच्या दिवशीं,

(गोपा मुनकिंफ्याच्या वेळीं) प्रीत दिवे, रंगाचा तांम्या व बाळ कृष्णाची मूर्ति ठेवून जी मानकऱ्याच्या डोक्यावर ठेवतात ती झाउ गोपा अर्थ ३ पहा [झाल]

झालर—स्त्री १ झांज, झांजरी, टाळ 'मुहूर्तविद झालर त्वरित वाजवी त्या क्षणीं।' —वीरभद्रकविकृत सीतास्वयंवर ३० २ मोठ्या आवाजाचें एक रणवाद्य 'चौघडे व नगारे व ढोल व झालरी व ताशे इत्यादि रणवाद्यें गांवांत वाजणारा वाजवूं देऊं नये, परंतु मंगलवाद्यें वाजविल्यास चिंता नाहीं' —विष्णुबुवा ब्रह्मचारी-कृत-वेदोक्तधर्मप्रकाश पृ ४३६–४५० [स झल्लरी, हिं झालरी]

झाला—पु (वाद्य) सतारीच्या सर्व तारांवर (चिकारीच्या मुद्दां) द्रुत गतीनें मारलेले बोल काढणें, बीन किंवा सतार वाजवीत असतां कड-दोरीच्या तारेंत ताल भरणें

झालेपण—न जन्म, आयुष्य 'विजेगिंग मुदास आला म्हणोन नामोहरम व्हावें तरी झालेपणाचें सार्थक काय?' —भाव १० [म झाला=होणें याचा भूतकाळ+पण]

झा(झा)व—स्त्री (ना व) (उन्हाची) झळ, तिरीप 'दुसऱ्या उदाहरणांत उन्हाची झाव, आसपासची घाण व अशक्तता .' —न्यायप १३३ [स दह् प्रा झाप=जळणें, भाजणें, प्रा. झावण=दहन किंवा झाळ] ०काढणें-(व) एखाद्याची खरडपट्टी काढणें झावेला-वि (व) झळ लागल्यामुळें म्लान झालेला [झाव]

झा(झा)वळ—वि १ विसराळू भ्रमिष्ट, भ्रांतिष्ट, अजागळ, झावऱ्या 'बुद्धि झावळ जयाची। तो तें मानी।' —अयराज ६ ६७ २ विसराळूपणाचें, भ्रमिष्टपणाचें, गबाळपणाचें (वर्तन, भाषण इ०) ३ अस्पष्ट अंधुक, संदिग्ध 'एन्हवीं संकल्पाचिये सांज वेळे। नावेक तिमिरेंजती बुद्धीचे डोळे। म्हणोनि अखंडित परि झावळें। मृगजळ ऐसें देखे।' —ज्ञा ९ ७२ [स श्यामल?]
झावळणें—अकि भ्रमिष्ट होणें —दार ०झावळ-मावळ-धावळ—नली मुळुमुळु झाकड, झांजडमाजड सर्व अर्थी पहा —क्रिवि अधुकपणें

झावळी—स्त्री (कों) ताडामाडाचा, पोफळीचा, सुरमाडाचा झाप, फादी (विणलेली किंवा साधी) सामान्यतः सावळी असा शब्द आहे पण मुंबईच्या आसपास झावळी हा शब्द वापरतात 'सरळ मोठ सुरमाड यावर यत्र निवट झावळी।' —प्रला १५४ [स छाया+वल्ली]

झा(झां)वळी-ळें—स्त्रीन झांजड, अंधार, अस्पष्ट उजेड 'चांदणियाचें झावळें। दखणें जैसें।' —भाए २९६ [स श्यामल?]

झासाड—न खडकावर आपटणारी पाण्याची लाट (क्रि० उसळणें उठणें पडणें)

झासू—वि क्षुद्रक, फिरकोल झाऊ पहा

झांस—पु (महानु) दाट झाडी 'अनर्थांच आसुर। जेथ झांस दुर्धर। अतिस्नेहाचें पासर। उठाळें देति।' —ज्ञान २७८ [टीप-मंथातील अर्थ बरोबर नसावा स ज्ञस, प्रा झस=मासा हा अर्थ नीट लागतो]

झांसा—पु. १ (दुसऱ्याला लुबाडण्याची, दगा किंवा दुःख देण्याची, फाईट करण्याची) धमकावणी, दहशत, दपटशा, धाक, भीति (झागा याच्या उलट अर्थी), अमुक गोष्ट न केल्यास पुढें तुमें अमुक तऱ्हेनें फाईट करीन अशी (एखाद्यास) सूचना, धम कावणी 'मनाचा पत्लाहार कैसा। निर्गुणी पाडी गुणाचा फांसा। लावूनि जीवपणाचा झांसा। रामारवळसा आवर्ती।' —एभा २१ ११७ २ लुच्चेगिरी, गुंडगिरी, ठकळेगिरी ' झांसा करण्यास कोणी माणूस निघेल आणि त्यामुळें बंड, फितुर होईल तर माजि स्ट्रेटानें सदर अदालतीची आज्ञा घेऊन ' —न्यासे १०० [स झष्=मारणें, दगा करणें, हिं झांसा=दगा, धोका, गु झांसो=दगा झागा]

झांसा—पु तळमळ 'लाविसी हरि किती मज झांसा।' —सादह ४ ११७ [स ध्यास]

झांसुरणें—अकि मनांत झुरणें, तळमळणें 'तेंहि ब्रह्मणु नेंवों सरे। कीं हाणिवेनि सिणे झांसुरे।' —ज्ञा १७ २९१ [झांसा]

झांसुरणें—अकि आळसानें स्वस्थ पडून असणें, निश्चेष्ट पडणें 'उचितानुचित आघवें। झांसुरतां भाठवे जीवें।' —ज्ञा १४ १८४ [झांसा]

झाळ—स्त्री (उन्हाची) झळ, तिरीप, झळई 'झाळेंकरोनि म्लानलें मुख।' —दावि १५७ [स ज्वाल, झला]

झांळणी—पु (गो) पावसाळ्याचें कापडी छप्पर [झोळणा]

झाळणी—स्त्री १ झाळण्याची, डांक लावण्याची क्रिया, डांक लावून घर बसविणें २ झाळलेली, डांक लावलेली अवस्था [झाळणें]

झाळणें—सकि (धातूची भांडीं इ० काम) कस्तर, डांक लावून अग्निसंयोगानें साधणें, जोडणें [स ज्वल्? हिं झालना, गु झाळवु]

झि(झि)कणें—सकि (राजा) वरचेवर हेलणें, पकडणें, धरणें झिकणार-वि (गो) झेलणारा [जिंकणें?]

झिक(ग)झिक(ग)—स्त्री निगजिग पहा

झिकझिकणें, झिकझि(मि)को, झिकझिकीत—जिग मध्यें पहा

झिकलेस—स्त्री (भरतकाम) जरतारीचें यद जिगची ल्स वीक पहा [झिक=जिग+इं लेस=फीत]

झिकवण-वणी—स्त्री पसवणी, झक्वण-वणी पहा (क्रि० करणें, लावणें, मांडणें)

